# माझें मनोगत

या लहानशा पुस्तकाच्या द्वारे भारतीय संस्कृतीच्या एका अंगाचे दर्शन घडविण्याचा यत्न मी केला आहे.

संस्कृति म्हणजे जीवनप्रवाह; असतांतून सताकडे, मृत्यूकडून अमरत्वाकडे, पशुत्वांतून मनुष्यत्वाकडे जाणारा. हा सहस्रावधि वर्षांचा प्रवास करीत असतां मानवानें देशकालपरिस्थितीशी झुंजतांना आलेल्या पुरुषार्थानें घडविलेला जीवनौघ म्हणजे संस्कृति. म्हणून ती देशकालसापेक्ष असते.

भारतीय संस्कृति अशी अगदीं सहजपणें घडत असतां अर्थातच या देशाची भौगोलिक अवस्था, येथील परिस्थिति आणि गेल्या दशसहस्रांहून अधिक वर्षांना काळ, याचा तिच्यावर परिणाम झालेला आहे. हेंच तिचें वैशिष्ट्य.

पशुत्वापासून मनुष्यत्वाचा हा प्रवास अगदीं आजही सुरू आहे. मार्ग निश्चित झाले आहेत. पण प्रतिदिवशीं या पंथाचे नवे नवे वाटसरू यावर पद-क्षेप करीत आहेत. त्यांचा प्रवास सुकर व्हावा यासाठीं पूर्वीच्या यात्रेकरूंचीं पदचिन्हें आवर्जून जतन करून ठेवणें आवश्यक आहे.

या प्रवासांत मानवापुढें अनेक जटिल प्रश्न निर्माण झाले. समाज-मंदिराच्या पायाची घडणूक चालली असतां नाना समस्यांचीं उत्तरें त्याला शोधून काढावी लागलीं. ऋग्वेदांत गाइला गेलेला यम-यमी संवाद हें या विग्रहाचें एक स्पष्ट असें पदचिन्ह आहे. भाऊबहिणीचें नातें ठरायला या संवादानें खूपच साहाय्य केले आहे. किंबहुना तो संवाद या समाजमंदिराच्या पायांतील एक दगडच आहे.

अनेकानेक मानसिक दुर्बलतांकडून कित्येक वेळा पराजित होऊनही शेवटीं आपल्या पुरुषार्थाच्या बळाने मानवाने त्याच्यावर जय मिळविला आहे. नाना भ्रमोत्पादक युक्तिजालांतून तो मोठ्या पराक्रमानें बाहेर आला आहे.

भाऊबहिणीचें नातें स्थिर झालें, आणि नंतर त्याला अत्यंत भावमधुर असे आकार मिळत गेले. विश्वांतील सगळ्या पवित्र वस्तूंत या नात्यानें अत्यंत मानाचें स्थान मिळविलें आहे

या पवित्रतेचें प्रतीक म्हणजे रक्षाबन्धन. अवघे पवित्र संकेत या प्रतीकांत एकवटले आहेत.

भारतीय संस्कृति सर्वस्पर्शी आहे थोड्या वेगळ्या शब्दात सांगायचें, तर तो हुताशन आहे. इच्यापाशी संकुचिततेला थारा नाही. जें जें हिच्या सन्निध आलें, तें तें तिनें आपलें स्वरूप देऊन आत्मसात करून टाकले. बौद्धावतार, द्राविडांची लिंगपूजा, इत्यादि गोष्टी या विधानाचे साक्षीदार आहेत. हिची पचनशक्ति मोठी जबर. हिने शक, हूण, ग्रीक यांना तर पचविलेंच, पण या संस्कृतीशीं हाडवैर असलेल्या अन्यसंस्कृतिवानांचीं शिंगेंनखेंही हिनें

नाहीशीं करून टाकली. कबीर, रसखान, शेख महंमद, जायसी हीं या पचनशक्तीची ज्वलन्त प्रमाणें आहेत कर्मवतीनें धाडलेल्या राखीचा स्वीकार करतांना हुमायून याच शक्तीनें भारला गेला होता. भारताच्या जलवायूनी त्याच्यावर जे संस्कार केले, त्या संस्कारांमुळेंच त्यानें चितोडचें धांवणें केलें. अर्थातच दुधाचें अमृतत्व नाहीसें करून त्याच्यांत दाहक मारक-शक्ति निर्माण करणारे सर्प, ही वस्तूही विसरतां येणार नाहीं, पण मनुष्य-स्वभाव हा सर्वत्र सारखाच आहे.

या पाच कथांत चितारलेली चित्रें—त्यांतील प्रतिमा सर्वस्वी ऐति-हासिक आहेत, असें मुळीच नव्हे. कथेची घडण करीत असतां कल्पनेकडे करावी लागणारी उमेदवारी मी केलीच आहे. घडलेले प्रसंग हा इतिहास आहे, त्याची कलाकुसर ही माझी आहे.

भारतीय संस्कृतीचे हे अतिविशाल स्वरूप डोळ्यासमोर ठेवूनच मीं या कथा लिहिल्या आहेत हा माझा दृष्टिकोण लक्षांत घेऊन त्या वाचल्या असतां गैरसमज निर्माण होणार नाहीं.

भाऊबीज,
शके १८७-

गोपाल नीलकण्ठ दाण्डेकर

# वाचकांशीं हितगुज

एका विशिष्ट परीचें वाङ्मय वाचकांस प्रस्तुत करावें, या हेतूनें वीणा साहित्यानें " रक्षाबन्धन " हें प्रथम पुष्प त्यांचे समोर उपस्थित केलें आहे. बहुधा सगळेच हेतु स्तुत्य असतात, पण त्यांची पूर्तता होत असतां गणपतीचा वानर होण्याची सहजशक्यता असते. कारण हेतुपूर्तीच्या साधनेचा मार्ग बहुधा नेहमीच संकटग्रस्त असतो. आम्हीही या नानाविध संकटाच्या भयापासून मुक्त नाहीं. इतर चारांची गत, तीच आमचीही, हेंही आम्हांस ठाउकी आहे. तरी परिस्थितीशीं झुंजण्याचा प्रयत्न करील, तोच पुरुषार्थी. पुरुषार्थ्यांच्या यादीत आमचेंही नाव घालायला हवें, हें आम्ही नम्रपणें सुचवतो. याचें प्रत्यंतर या पुस्तकाचें मूल्य. अधिक मूल्यें ठेवण्याची स्पर्धा चालू असलेल्या या जमान्यांत रक्षाबन्धनाचें मूल्य दीड रुपया, हें निःसंशय साहस आहे, पण तें आम्हीं केलें आहे आणि वाचकांच्या स्नेहाच्या बळावर आम्ही त्यांत यशस्वी होऊं असा आमचा विश्वास आहे.

— प्रकाशक

# रक्षाबन्धन

भारतीय संस्कृतीचा शुभ सन्देश विश्वमात्रांत पोंचविण्याच्या हेतूनें प्रेरित होऊन ज्या कालीं आर्यांचे अनेक संघ दुथडी भरलेल्या नद्या, दुर्लंघ्य पर्वत आणि गहन वनें, यांची तमा न बाळगतां विश्वभर प्रवास करीत होते, त्या काळची कथा--

भगवान् विवस्वान् आपल्यासवें एक संघ घेऊन दक्षिणेच्या महाप्रवासास निघाले होते. जिथें जायचें, तो प्रान्त अज्ञात होता. तिथला भूगोल, इतिहास, वनांची निबिडता, पर्वतांचें दुर्लंघ्यत्व, नद्यांची गहनता, त्यांतील नक्र, वनांतील हिंस्र श्वापदें, यापैकीं एकाशींहि विवस्वानांचा परिचय नव्हता.

पण या सगळ्याची उणीव भरून काढणारा दुर्दम्य उत्साह, त्यानें मात्र विवस्वानांचें अन्तःकरण दुथडी भरून वहात होतें. कृण्वन्तो विश्वम् आर्यम्, या छन्दानें ते जणूं काय वेडेच झाले होते. आपलें स्वतःचें जीवन जगासमोर ठेवून ते धडा घालून देऊं इच्छीत होते कीं, जगावें कसें आणि मरावें कसें !

एका निबिड अरण्यांतून मार्ग शोधीत असतां तो संघ एका महान् सरितेच्या परिसरांत येऊन प्रविष्ट झाला.

भगवान सूर्यनारायणाच्या दिनचर्येचा उत्तरार्धहि संपत आला होता. अशा वेळीं त्या संघाचा वाटाड्या विवस्वानांकडे धांवत आला आणि हर्षानें नाचत म्हणूं लागला,

"भगवन्! सरितेचें दर्शन झालें! अति प्रचण्ड पात्र! ब्रह्मावर्ती-तल्या गंगेएवढं! अत्यंत सुंदर जल!"

विवस्वानांची किंचित् म्लान झालेली मुद्रा उजळली. ते तसेच मार्गे वळले. त्यांच्या मागोमाग एका धवल अश्वावर त्यांची पत्नी संज्ञादेवी आरूढ झाली होती. नऊ महिने आणि नऊ दिवस पूर्ण भरलेले. उदरशूल सुरू झालेला. त्या वेदनांनीं संज्ञादेवींची मुद्रा अगदी म्लान झाली होती. आपल्या म्हाताऱ्या, पण इमानी अश्वावर दोन्ही पाय एका बाजूस टाकून त्या बसल्या होत्या.

"ऐकलेंत?" भगवान् विवस्वान म्हणाले.

"काय?"

"श्वेत्रांकाला सरितातटाक दिसला! सरितातटाक, हें अत्यन्त पवित्र क्षेत्र. इथें जन्मणाऱ्या बालकांचें यश सरिताजलाप्रमाणें जगताला सन्तोष देणारें होतें. प्रसूति होऊन एक मास होईपर्यंत आपण इथेंच थाबूं या!"

वाटाड्यानें निर्दिष्ट केलेल्या मार्गानें तो संघ ऐन तटाकावर जाऊन पोंचला. सरितेचें तें भव्य, मनोहारी दृश्य पाहून भगवान् विवस्वान् आणि संज्ञादेवी, दोघेंहि क्षणभर देहभान विसरलीं. आनंदाच्या आवेगांत विव-स्वानांच्या मुखांतून शब्द बाहेर पडले,

"अहा! काय सन्तोष झाला! मातुश्री सरिते, तू आम्हाला सुख–नर्म दिलेंस; लोक इथून पुढें तुला नर्मदा म्हणून ओळखोत!"

तेव्हांपासून नर्मदेचें नामकरण झालें.

एका विस्तीर्ण वटवृक्षाखालील भूमि स्वच्छ करून त्या ठिकाणी संघ-वासीयांनीं गेंड्याच्या कातड्याचा एक तंबू ठोकला. विवस्वान् संज्ञादेवींना म्हणाले,

"चला, तुमचें विश्रामस्थान सिद्ध झालें."

संज्ञादेवी त्या तंबूत जाऊन पहुडल्या.

त्या संघांत ब्राह्मण होते, क्षत्रिय होते, वैश्य होते, शूद्र होते. वैश्यांचे बरोबर भूमि नांगरण्याचीं, पेरण्याचीं साधनें असलेले कांहीं शकट होते, व त्या शकटांच्या मागोमाग गाईंचें एक भलें मोठें खिल्लार चालत होतें. त्या संघासवें रथकार होते, चर्मकार होते, रजक होते, सुवर्णकारही होते.

संघाबरोबर असलेले ब्राह्मण मंत्रद्रष्टे ऋषि होते. ते निरनिराळीं स्थलें पहात, अन्यान्य निसर्ग–चमत्कार अवलोकीत, आणि त्यांच्या मुखांतून सहजपणे त्या निसर्गाच्या निर्मात्याची स्तुति करणारीं सूक्तें बाहेर पडत. त्याच्याबरोबर असलेला शिष्यसमूह तीं ऐके, मुखगत करी, आणि सायंकाळीं विश्रामाचे ठिकाणीं ती सूक्तें वीणेच्या मधुर ध्वनीबरोबर गाऊन त्या संघाचें मनरंजन करीत असे.

क्षत्रिय त्या संघाचें क्षतांपासून – संकटापासून त्राण – सरक्षण करीत. मार्गीत भेटणाऱ्या हिंस्र श्वापदांना नाश करावा, वेळीं जर एकाद्या वन्य जातीने या संघावर आक्रमणच केलें, तर त्यांच्याशीं युद्ध करावें, हें क्षत्रियां-करितां राखून ठेवलेलें काम होतें.

पण भगवान् विवस्वान् बहुधा युद्धाचा प्रसंगच येऊं देत नसत. त्यांना संस्कृत आणि प्राकृत भाषांचे बरोबरच वन्य भाषाहि अवगत होत्या. त्या वन्य जातीशीं अत्यंत प्रेमानें वागून विवस्वान् हळूहळू त्या समूहाचें रूपा-न्तर आर्यांत करून टाकीत.

या संघाचा मार्ग निश्चित करून तो प्रवास करण्याजोगा करायचा, हें काम शूद्रांनीं स्वीकारलें होतें. ते कष्टाळू शूद्र दिवसभरच्या श्रमांनीं थकत. पण सायंकाळीं मुक्कामावर पोंचल्यावर भगवान् विवस्वान् स्वतः त्यांच्यांत मिसळून त्यांच्या पाठीवर हात फिरवीत, त्यानें त्यांचा अर्धा श्रम-परिहार होत असे. शेष राहिलेला श्रम सामगानाच्या आनंदांत लय पावे.

या संघाची यात्रा ज्या कालांत सुरु होती, तेव्हां बहुधा सर्व देश निर्मनुष्य होता. वनांच्या आश्रयानें कांहीं वन्य जाती रहात, तेवढा भाग सोडला, तर इतर सर्व देशांत माणसाचें पाऊलहि उमटलें नव्हतें. त्या सर्व प्रांतांत हिंस्र पशूंचेंच साम्राज्य चाले.

दोन पर्वतांच्या मध्यें एखाद्या नदीच्या कांठचा प्रदेश मोठा सुपीक असायचा. नाना प्रकारच्या वृक्षलता त्यांत अगदीं स्वच्छंदानें वाढलेल्या. असा प्रदेश दृष्टीच्या टप्प्यांत आला, कीं मग भगवान विवस्वान् तिथें थांबत. त्यानंतर ते आपणांपैकीं काहीं ब्राह्मण, क्षत्रिय, वैश्य, शूद्र कुटुंबें त्या प्रान्तांत पेरून तो प्रान्त लागवडीस आलेला पहात. हळूहळू त्या प्रान्ताचें वन्य स्वरूप पालटे. झाडी नाहींशी होई, भूमि नांगरली जाई. पिकें डोलूं लागत. गाईगुरांचे कळप हंबरूं लागत. मग त्या प्रांताचें नामकरण करून भगवान विवस्वान् पुढें निघत.

या पेरणीमुळें त्यांच्याबरोबर असलेल्या संघाची संख्या हळूहळू कमी होत चालली. तरी भगवानांचा प्रवास सुरूच होता. चालतां चालतां त्यांनीं नर्मदेच्या परिसरांत प्रवेश केला, त्या वेळी सञ्ज्ञादेवींचा प्रसूति-समय जवळ आला होता.

  

विवस्वानांच्या त्या आवासाभोंवतीं त्वरित सगळ्या सघवासीयांची पालें पडलीं. आम्रवृक्षाच्या एका राईत ब्राह्मणांनीं आपल्या कामचलाऊ कुट्या उभारल्या. त्या कुट्यांचे मध्यभागीं एक विस्तीर्ण प्रांगण स्वच्छ केलें गेलें, व त्याच्या केन्द्रभागी एका होमकुंडाची रचना झाली. संघाबरोबर असलेला यज्ञीय अग्नि वहन करण्याचें काम ज्या ब्राह्मणाकडे होतें, त्यानें तो अग्नि त्या कुंडांत प्रस्थापित केला. ऋचांच्या गंभीर ध्वनीनें ती आमराई निनादली.

क्षत्रियांच्या राहुट्या त्या निवासस्थानाच्या चहुंबाजूंनीं पसरल्या. कारण क्षत्रियांना त्या निवासस्थानाचें रक्षण करायचें होतें. एका बाजूला वैश्यांनीं आपलीं निवासस्थानें निर्माण केलीं. त्यांच्या पत्नी गाईंचें दूध काढण्यामागें लागल्या. भाजलेलीं मृत्तिकापात्रें हातीं घेऊन धारोष्ण दूध पिण्याकरितां पोरें आयांच्या गळ्यांत पडूं लागलीं.

थकलेले शूद्र आपापल्या झोंपड्यांसमोर बसून आपण केलेला प्रवास त्वरित छंदबद्ध करून गाऊं लागले. एक जण एक छंद ऐकवी, तर त्यामुळें दुसऱ्याला स्फुरण येऊन तो अधिक मोठ्या स्वरांत दुसरा छंद पुढें फेंकी.

त्यांच्या स्त्रिया आपापल्या भुकेजल्या पोरांना पाजीत कंदमुळें भाजण्याच्या नादीं लागल्या.

सगळ्या संघाची सोय झाली कीं नाहीं, हें पाहून विवस्वान् जों आपल्या आवासाकडे परत येताहेत, तों संज्ञादेवी शय्येवर गडबडा लोळूं लागल्या होत्या. त्यांच्या उशाशीं बसलेल्या दोन वृद्ध स्त्रिया सोमवल्ली वाटा-वयाच्या पाट्यावर काहीतरी औषधी वाटीत बसल्या होत्या. आवासाच्या द्वाराजवळ, आत आणि बाहेर इतर कांहीं स्त्रिया उगीचच खेद प्रगट करीत आणि कुमफुस करीत बसल्या होत्या. भगवानांना पहाताच त्यांनीं आपापलीं उत्तरीयें सावरली, आणि मर्यादेनें थोडशा बाजूस सरकल्या. कमींत कमी आज तरी त्या आवासांत त्याची उपस्थिति आवश्यक होती. कारण त्या नसतील, तर मग चुकचुक करून अपत्यजन्माच्या वेळच्या वेदनांचे सरस वर्णन कोण करील ? अपत्याचा वर्ण, त्याची शरीरयष्टि, त्याची सुरूपता आणि कुरूपता, त्याच्या हातापायाचे चाळे, यांची निंदा आणि स्तुति हें पुराण कोण मांडील ? तेव्हां अशी अमूल्य संधि न गमावण्याचें निश्चित करून भगवान विवस्वान् आवासात असतांनाहि त्या स्त्रिया तिथेंच चिकटून राहिल्या.

"काय, अधिक वेदना होत आहेत ?" चिंतातुर विवस्वानांनी विचारलें.

संज्ञादेवींनी काहीच उत्तर दिले नाहीं. त्या दोन वृद्ध स्त्रियांपैकीं एक जण म्हणाली,

"दिक्पाल, स्थानदेवता, कालदेवता, यांची शान्ति करायला हवी. बहुधा त्याच असन्तुष्ट होऊन पीडा देत असाव्या."

विवस्वानांनी, लगेच आचार्यांकडे एक दूत धाडला.

रात्रभर ब्राह्मण त्या आवासासमोरील वृक्षाखाली बसून रक्षोघ्न सूक्तें म्हणत होते.

  

दुसऱ्या दिवशींची उषा अरुण रंगाचा शिडकाव करीत पूर्वाचलावरून डोकावूं लागली, तेव्हां तो ब्रह्मवृंद उषेचीं गीतें गाऊं लागला. हळूहळू उषेचें बोट धरून बाल भास्करानें सोन्याची कुंची लेऊन पूर्वांगणांत प्रवेश केला.

तोंच विवस्वानांच्या आवासांतून एक स्त्री धांवत विवस्वानांकडे आली.

रात्रभर ते जागे होते. मंत्र म्हणत असलेल्या ब्राह्मणांच्या शेजारीं एका झाडाच्या बुंध्यास टेकून ते बसले होते. बालपणापासून धनुष्याशीं लगट करून घट्टे पडलेल्या दोन्ही हातांनीं त्यांनी आपलें मुख झांकून घेतलें होतें. संज्ञादेवींचें विव्हळणें त्यांना एवढ्या ब्राह्मणांच्या मंत्रघोषाचा भेद करूनहि ऐकूं येत होतें. आणि विशेष असा कीं, हें विव्हळणें ऐकण्यापलीकडे विवस्वान् दुसरें कांहीच करूं शकत नव्हते.

" भगवन् ! " आनदानें चीत्कार करीत ती स्त्री म्हणाली.

तटकन् विवस्वान् आपल्या विचारसमाधीतून जागे झाले. स्त्रीला पाहून कांहीं ब्राह्मणहि तिच्याकडे धावत आले.

"काय झालें ?" त्या ब्राह्मणांपैकी एकाने पृच्छा केली.

ती स्त्री मोठी चतुर होती. तिने ब्राह्मणांकडे वळून प्रश्न केला,

" पूर्वाचलामागून कोण डोकावतं आहे ? "

" दिनराज ! " उत्तर आलं.

" त्याच्या अगोदर ? "

" उषाराणी ! "

" उषा आली, आणि दिनराज आला ! प्रथम उषा, नंतर भास्कर ! पण भगवानांच्या आवासांत अगोदर भास्कर आला आणि त्याच्या नंतर उषा ! " त्या स्त्रीनें आनंदाने एक गिरकी घेऊन उत्तर दिले.

अत्यानंदानें विवस्वान् उठून त्या स्त्रीजवळ गेले. तिचे खांदे धरून त्यांनी तिला आपणासमोर उभें केलें, आणि गदगदा हालवीत प्रश्न केला.

" म्हणत्येस काय भद्रे ? "

" होय देव ! मला एक भाऊ झाला आणि बहीणहि ! "

विवस्वानांनीं आपल्या कण्ठांतला बहुमूल्य रत्नांचा हार तटकन् तोडला, आणि तो भद्रेच्या कण्ठाभोंवतीं गुंडाळला. मग ते धांवतच आवासाकडे निघाले. ब्राह्मणांनीं वेदघोषाचें कांहीं प्रयोजन राहिलें नाहीं असें जाणून त्यांचें अनुकरण केलें.

आवासासमोर स्त्रिया नृत्याचा फेर धरण्याच्या विचारांत होत्या. पण मनुष्यांची ती झुंड पळत आलेली पाहून त्या थांबल्या. भगवान विवस्वान् थेट आवासांत शिरले.

त्यांनीं असें पाहिलें कीं, संज्ञादेवींच्या कुशींत दोन चिमणीं बाळें रडत असून अपूर्व समाधानी मुद्रेनें संज्ञादेवी त्यांच्याकडे बघत आहेत.

विवस्वान् खालीं बसले. त्या चिमण्यांना हळूच करस्पर्श करून ते म्हणाले,

"दोन अपत्यें! एक पुत्र आणि एक पुत्री?"

"होय!" किंचित् लाजून सहर्ष मुद्रेनें संज्ञादेवी म्हणाल्या, "एक पुत्र आणि एक पुत्री!"

"तू किती चांगली आहेस! तुला फार कष्ट झाले नाहीं?" विवस्वानांनीं संज्ञादेवींच्या मुखावरून हात फिरवीत म्हटलें.

"संतोषाचा जन्म कष्टाचे उदरींच होत असतो, असें आपणच नाहीं का सांगितलेंत?"

विवस्वान् हंसले, आणि त्या बालकांना उचलून घ्यायचा प्रयत्न करूं लागले, तोंच हातीं कांहीं पानें आणि मुळ्या घेऊन एक वृद्धा आंत शिरली; ती म्हणाली,

"देव! आपला हा कांहीं पहिलाच अपत्यलाभ नव्हे ना?"

"छे छे!" या पाळीला लाजण्याचें काम विवस्वानांकडे होतें. ते अंग चोरीत म्हणाले,

"या सोनुल्यांची मोठी भावंडें ब्रह्मावर्ती त्यांच्या आजाजवळ राहिलीं आहेत."

"तर मग जन्मल्यावर मुलांना कांहीं औषधोपचार करावा लागतो, हें आपणास वस्तुतः माहीत असायला पाहिजे. आपण आवासांतून बाहेर –"

"हो हो! माझ्या लक्षांतच आलें नाहीं हां!" असें म्हणत घाईघाईनें विवस्वान् बाहेर आले. शेजारीं उभा असलेल्या एका अनुचरास ते म्हणाले,

"जा! ज्यांनीं ही वार्ता ऐकली नसेल, त्यांना सांग! म्हणावें विवस्वानांस कुल उज्वल करणारा पुत्र आणि पुत्री झाली आहे!"

थोड्याच वेळांत आवासाबाहेरील प्रांगण हर्षनिर्भर समुदायानें भरून गेलें. स्त्रियांच्या नृत्यवर्तुलाच्या शेजारींच पुरुषांनींहि नृत्यवर्तुल मांडलें, आणि गाणीं गात ते सगळे मोठ्या उन्मादानें नाचूं लागले. त्यांतच भर पडली ब्राह्मणांच्या वेदघोषाची.

त्या वनांतले सनातन रहिवासी पक्षी आज हें काय नवीनच प्रकरण निर्माण झालें, असें आश्चर्य मानून आपापल्या घरट्यांतून डोकावून त्या नृत्याकडे पाहूं लागले.

  

पुत्राचें नांव यम ठेवलें, आणि कन्येचे यमुना.

सहा वर्षें कालपुरुषानें चाटून टाकलीं आहेत. भगवान विवस्वान् दक्षिणेचें पठार ओलांडून मलयगिरीच्या शेजारीं जाऊन पोंचले आहेत.

बरोबर असलेले संघवासी कमी होत होत आतां अगदी मोजकीं माणसें राहिलीं आहेत. तीनचार ब्राह्मण कुटुंबें, कांहीं वैश्य. दाक्षिणात्य तद्देशीयांपैकीं बऱ्याच कुटुंबानी सुसंस्कृत होऊन वैश्य आणि क्षत्रिय वृत्ति स्वीकारली आहे. भगवानांच्या त्या विशाल कुटुंबाचें रक्षण करण्याचा भार तद्देशीय नवक्षत्रियांनींच उचलला आहे.

आज भगवानांचा निवास ज्या स्थानी आहे, तें दक्षिणेंतील जणूं नंदनवनच. एका पर्वताचें विस्तीर्ण पठार. वर तुडंब भरलेले जलाशय. त्यांत मलयगिरीच्या अतिशीतल, सुगंधी झुळकीशीं क्रीडा करणारी कमलें. नाना वर्णांचीं व आकारांचीं. कांही निळीं, कांहीं लाल. कांही पिवळीं कांहीं पांढरी.

ऐन पठारावर भगवानांच्या बरोबरच्या वैश्यशूद्रांनीं पिकवलेलीं भाताची शेतें. ती संपलीं की, मग नानाविध वृक्षांनीं व लतानीं जणूं फुलून आलेला पर्वताचा उतार एका बाजूस एक वृक्षाच्छादित शिलाखडानी भर-लेली टेकडी. तीवर एक अत्यंत रम्य आश्रम. त्या टेकडीच्या पायथ्याशीं एक सुंदर, झुळझुळु वाहणारा निर्झर.

पठाराभोंवतीं असलेल्या पर्वतराजींत नाना प्रकारचे वृक्ष. कांहीं भूमीशीं मित्रता करणारे, तर कांहीं मलयानिलाशीं वार्तालाप करण्यासाठीं

गगनांत मस्तकें उंचावून बसलेले. कांहींचीं खोडें अति विस्तीर्ण, तर कांहींचीं अंगुलिमात्र प्रमाणाचीं. कांहींचीं पर्णे तिलप्रमाण, तर कांहींचीं वर्षाकालीं मस्तकीं धारण करावीं, एवढीं मोठीं.

अशा अत्यंत रम्य स्थलीं भगवानांचें वास्तव्य होतें. टेकडीवरील आश्रमांत चार माणसें रहात, विवस्वान्, संज्ञादेवी, यम आणि यमुना.

जसा यम, तशीच यमुना. स्वरूपाचे बाबतींन अगदीं तिलप्राय अंतर नाही. संज्ञादेवीनीं कौतुकानें त्या दोघांना अगदीं समान आवरणांनी सजवावें. दोघांनाहि पीतांबर नेसवावे, कमरेस उत्तरीयें बांधावींत, बाहूवर बाहुबंधनें चढवावींत, मस्तकीं सुवर्णमुकुट ठेवावेत, आणि आपल्या त्या अत्यंत सुंदर लेकरास दृष्टीभर न्याहाळून कोणाची दृष्ट लागेल की काय म्हणून त्यांना पोटाशीं धरून आपल्या उत्तरीयाखालीं झांकून घ्यावें.

पण साम्य तेवढें रूपांतच. स्वभावात दोघाचें जमत नाहीं. यम बालपणांतच स्थिर बुद्धीचा, तर यमुना हरिणशावकासारख्या चचल वृत्तीची.

सातवे वर्षीं यमाचा चौलसंस्कार करायचें ठरलें. समारंभ म्हटला कीं, दाक्षिणात्याच्या उत्सवप्रियतेला बहर यायचा. नानाप्रकारची सामग्री एकत्र झाली. उत्कृष्ट मांस, मद्याचे कलश, केळ., नार , सोमवल्ली, पुष्पें, केळीचीं पानें, तांदूळ इत्यादि नानाप्रकारच्या वस्तूंची रास आश्रमाच्या द्वाराशी एकत्र झाली.

संस्काराचा दिवस उजाडला. पहांटे विवस्वान् यमाला उठवून म्हणाले,

"बाळ, ऊठ. आज तुझा चौलसंस्कार करायचा ना ?"

यम उठला. सिंधुनटाकीच्या मेंढयांच्या लोंकरीनें उबदार ऊर्णवस्त्र त्यानें एका बाजूस सारलें. तो म्हणाला,

"तात, चौलसंस्कार म्हणजे काय करायचे ?"

"तुझ्या मस्तकावर हा जो कुंतलभार आहे, तो उतरावयाचा."

यमुना यमाचे शेजारींच आपल्या अंथरुणावर झोंपली होती. तातांच्या हांक मारण्यानें तीहि जागी झाली होती खरी, पण अजून ती आपल्या पांघरुणांत घुसमटून पडली होती. कुंतलभार उतरविण्याची गोष्ट ऐकतांच ती तटकन् उठून बसली, आणि तातांना म्हणाली,

"तात, माझाहि उतरायचा."

हंसून विवस्वान् म्हणाले,

"वा वा! तूं कन्या आहेस ना? कन्यांचा कुंतलभार उतरवायचा नसतो."

"कां?"

"कां? स्त्रिया सुकुमार असतात. त्यांना केशराशि शोभून दिसतात. त्यांचे केश कापीत नाहींत. तुझ्या कुंतलांची सुंदर रचना करायची. त्यांत निरनिराळीं पुष्पें खोंचून ठेवायचीं. समजलें ना?"

"पण मग यमाचा कुंतलभार कां काढायचा?"

"तो पुरुष आहे म्हणून."

"पुरुष असला म्हणून काय झालें? मग माझाहि उतरायचा!"

अंथरुणांतून उठून यमुना यमाच्या जवळ आली, आणि त्याच्या डोक्याला डोकें लावून विवस्वानांस म्हणाली,

"बघा तर! यम आणि मी अगदीं सारखीं आहों कीं नाही! पुरुष असला म्हणजे काय होतें?"

संज्ञादेवी दाराआडून हा संवाद ऐकत होत्या. त्या आंत येऊन म्हणाल्या,

"बाळ! असा हट्ट करूं नये. पुरुष राकट असतात, त्यांना केशरचना करण्याएवढा वेळहि मिळत नाही. म्हणून ते केश कापतात."

यमुनेजवळ या युक्तिकरितांहि उत्तर तयार होतें. ती म्हणाली,

"मग मीहि राकट होईन! जर यमाचे केश कापायचे असतील, तर मग माझेहि कापायचे!"

यमुना जी हट्ट धरून बसली, ती कांहीं ऐकेना. परोपरीनीं समजावून पाहिलें, पण तिची समजूत पटेना. तिनें यमाबरोबर सगळे चौलपूर्व संस्कार करून घेतले.

होम उरकला, आणि नापित येऊन आपल्या वस्तऱ्याला दगडावर घांसूं लागला, तेव्हां मात्र यमुना चरकली. तिनें यमाला विचारलें,

"दादा, त्या लहानशा खड्गानें का केश कापायचे?"

"होय."

विवस्वानांनीं यमास नापितासमोर नेऊन बसविलें. ब्राह्मण चौलाचे मंत्र म्हणूं लागले, आणि यमाच्या मस्तकावरून वस्तरा चालूं लागला. बरींच वर्षें न पेरलेल्या भूमीत हल चालवितांना जसे कष्ट होतात, तसे कष्ट यम अनुभवूं लागला. पण त्या सात वर्षांच्या बालकानें मुख विकृत होऊं दिलें नाहीं. तीनचार ठिकाणी वस्तरा लागला. त्या वेदनांनीं नेत्रांतून आंसवें ठिबकलीं. पण कुणाला तीं दिसूं नयेत, म्हणून गुपचुप यमानें पुसून टाकलीं. प्रसन्न मुखानें तो त्या यातना सोशीत बसून राहिला.

यमुना यमाशेजारीच बसून हा विधि पहात होती. इतर कोणास जरी यमाच्या नेत्रांतील आसवें दिसलीं नाहींत, तरी यमुनेला मात्र यम फसवूं शकला नाही. त्याचे केशहीन होत असलेले मस्तक जेव्हां तिनें पाहिलें, तेव्हां तिला रडें अनावर झालें. ती मोठमोठ्यानें रडून यमास म्हणूं लागली,

"दादा, तुझ्या मस्तकाचें काय झाले रे हें? हा नापित अगदीं द्वाड आहे! रे नापिता, माझ्या दादाचे मस्तक जसे होतें तसें करून दे! नाहींतर तुला मी बोचकारीन!"

आणि मग तिनें आरडाओरडा करून जो गोंधळ घातला, तो थांब-वितां थांबवितां विवस्वानांच्या नाकी नऊ आले. त्या रडण्याच्या भरांत आपण चौलसंस्कार करण्याचा हट्ट केला होता, हेंहि यमुना विसरून गेली.

दिवसभर ती रडत होती. धडपणें जेवणेंहि तिला सुचलें नाहीं. रात्रीं जेव्हां यम आपल्या अंथरुणावर निजला, तेव्हां ती त्याच्या पांघरुणांत शिरली, आणि त्याच्या मस्तकावरून हात फिरवीत पुन: फुसफुस करीत रडूं लागली.

यम तिला समजावीत म्हणाला,

"यमुने रडूं नये!"

"मग तुझें मस्तक असे कां केलें त्या मेल्या नापितानें?"

"सांगितलें ना तुला? मी पुरुष आहें."

"मग माझ्यासारखा स्त्री कां झाला नाहींस तूं?"

खुदकन् हंसून यम म्हणाला,

"मग काय झालें असतें?"

"मग ? मग तुझा चौलसंस्कार केला नसता ना ! माझें मस्तक बघ !" यमाचा हात आपल्या मस्तकावर फिरवीत यमुना म्हणाली, "आहे ना कसें छान ? असेंच तुझेंहि राहिलें असतें. पण कां रे दादा ?"

"काय ?"

"पुरुष असला म्हणजे काय होतें ? अन् स्त्री असली म्हणजे काय ?"

"पाहिलें नाहींस ? आई आश्रमांत राहून पाकसिद्धि करते. तुला मला जेवूं घालते. तात घराबाहेरचीं कामें करतात. वन्य जनांशीं बोलतात, त्यांना शिकवतात."

"मग आई कां शिकवीत नाहीं ? आणि तात कां पाकसिद्धि करीत नाहींत ?"

"म्हणून. आतां तूं झोंप बघू !"

यमाजवळ म्हणून या शब्दापलीकडे या प्रश्नाचें कांहीं उत्तर नव्हतें. तेवढयानें यमुनेचें समाधान झालें नाहीं. ती चुळबुळ करीत झोंपून राहिली. मधून मधून ती यमाच्या मस्तकावरून हात फिरवी, आणि त्याला घट्ट धरून ठेवी. रात्रीं तिला आपला चौलसंस्कार होत असल्याचींच स्वप्नें पडलीं

  

त्यानंतर दोन वर्षांनीं यम आणि यमुनेचें उपनयन झालें, आणि तीं दोघें टेकडीच्या तळाशीं असलेल्या जलाशयाजवळ कुटी बांधून राहिलेल्या आचार्यांजवळ अध्ययनास जाऊं लागलीं. प्रतिदिनी सकाळीं मज्ञादेवी त्या दोघांस स्नान घालीत. नंतर पोतांबर नेसवून दोघांच्याहि कपाळावर मलयगिरीवरील चंदनाचा लेप करीत, छोटया छोटया कमलपुष्पांनी यमुनेचा केशभार सजवून त्या यम-यमुनेस क्षीर खाऊं घालीत, व पाठशाळेंत धाडून देत.

वृद्ध आचार्य वीणा अत्यंत सुंदर वाजवीत. त्यांनीं या दोघांसहि अध्ययनाबरोबर वीणा-वादन पढविण्यास प्रारंभ केला.

आठ दहा दिवस यमुना हौसेनें वीणा शिकावयास बसली. पण प्रतिदिवशीं तेच ते स्वर घोटायचा तिला कंटाळा येऊं लागला. अकराव्े दिवशीं जेव्हां यम वीणा घेऊन आचार्यांसमोर बसला, तेव्हां यमुना नाक मुरडीत म्हणाली,

"आचार्य, मला वीणा ऐकणेंच आवडतें."

वृद्ध आचार्य हंसून बोलले,

"तेच ते स्वर घोटायचा कंटाळा आलेला दिसतोय् !"

"कंटाळा नाहीं आला. पण मला गाणें आवडतें. गाणेंच शिकवाल का ?'

"शिकवीन कीं ! तूं नेटानें शिकली पाहिजेस."

दुसऱ्या दिवशीं आचार्यांनीं यमुनेला गानविद्येचे पाठ पढविण्यास प्रारम्भ केला. स्वर म्हणजे काय, सप्तस्वरांत भेद कुठें आणि कसा निर्माण होतो, स्वरनिनादाला नादब्रह्म कां म्हणतात, इत्यादि जटिल विषयांत प्रवेश होतांच यमुना म्हणाली,

"आचार्य ! हें सगळें मी मग शिकेन. अगोदर मला एक गाणें शिकवा."

हंसून आचार्यांनीं तिला एक गाणें शिकविलें. ते तिला आवडलेंहि. तो दिवसभर आणि रात्रीहि आश्रमाचा परिसर त्या गाण्याच्या लकेरींनीं निनादला. अर्थात् तें जसें शिकविलें गेलें, तसेच म्हटले जात होतें, असें मुळीच नव्हे.

दुसरे दिवशी आचार्यांपुढें जेव्हां यमुनेनें तें गीत म्हणून दाखविलें, तेव्हां आचार्य म्हणाले,

"वा: ! आतां तुला अधिक शिक्षण घेण्याची आवश्यकता राहिली नाहीं."

"कां ?" प्रमुदित चित्तानें यमुनेनें विचारलें.

"गानविद्या बिचारी मुमूर्षु होऊन शेवटच्या घटिकेची वाट पाहूं लागली आहे तुझ्या या पराक्रमानें. गानविद्येशी इतकी झोंबाझोंबी करण्याचें सामर्थ्य फार कमी लोकांत आढळतें ! –'

आचार्यांच्या म्हणण्यांतला सगळा आशय जरी यमुनेला कळला नाहीं, तरी तिला कमींतकमी इतकें तर निश्चितपणें समजलें कीं, आपलें गाणें आचार्यांना तितकेंसें आवडलें नाहीं. तो किंचित् फुरंगटून बसून राहिली.

आचार्यांनीं तिची कोमेजली मुद्रा पाहून तिला पुन: त्या [illegible]चा पाठ दिला. तोहि दिवस आणि रात्र आश्रमांत संगीतयज्ञ सुरू [illegible] त्याचें

होतृत्व होतें यमुनेकडे. पण दुसरे, तिसरे आणि चवथेहि दिवशीं जेव्हां तेंच तें गाणें घोटवून घेण्यापलीकडे आचार्यांचें पाऊल पडतां दिसेना, तेव्हां पांचवे दिवशीं यमुना आळस देऊन आचार्यांस म्हणाली,

"आचार्य !"

"काय ?"

"कांहीं नाहीं."

"मग हांक कां मारलीस ?"

"हा दादा म्हणत होता–"

"काय म्हणालों ग ?" यमानें आपला पाठ थांबवून विचारलें.

"नव्हे रे ! चुकलयें मी. तात म्हणाले–"

"काय म्हणाले ?" आचार्यांनीं विचारलें.

"तात म्हणाले, कीं, तू चांगले गात नाहींस !"

"केव्हां म्हणाले ग ?" यमानें आडरानांत गांठल्यासारखा प्रश्न पुन्हां केला.

"नाहीं रे ! ते कांहीं अगदीं म्हणालेच नाहींत ! पण मला तें असें म्हणतीलसें वाटलें."

आचार्य आपल्या हातांतील स्मरणी थांबवून मोठमोठ्यानें हंसूं लागले. व म्हणाले,

"तात्पर्य असें कीं, यमुनादेवी आपल्या संगीतसाधनेची इतिश्री करूं इच्छितात, असेंच कीं नाहीं ?"

यमुनेनें कांहीं न बोलतां केवळ तोंड फिरविलें. थोड्या वेळानें पुनः आचार्यांकडे वळून म्हणाली, "आचार्य, मला कीं नाही, भूर्जपत्रांवर लोह-शलाकेनें चित्रें काढणें फार आवडतें. तें शिकवा ना मला !"

सांगण्याचा इत्यर्थ असा कीं, यमुनेच्या भ्रमर वृत्तीमुळें तिचें रूप आणि बुद्धिमत्ता या दोन्हींना कस चढेनासा झाला. एके दिवशीं यम आणि यमुना आचार्यांकडे अध्ययनास गेल्यावर संज्ञादेवी विवस्वानाकडे आल्या. विवस्वान् एका कृष्णवर्णी वनवासीयानें आणलेल्या धनुष्यांच्या दंडांची परीक्षा करीत बसले होते.

" यावेंत." विवस्वान् प्रसन्न मुद्रेनें म्हणाले.

संज्ञादेवी आश्रमाच्या भिंतीस टेकून उभ्या राहिल्या. त्यांची चर्या कांहीं मोठी प्रसन्न दिसेना. आपल्या पुष्ट बाहूंनीं वांकवीत असलेला धनुष्य-दंड तसाच हातीं ठेवून विवस्वान् म्हणाले,

" कां? आज मुद्राकाश मेघाच्छन्न झालें आहे?"

" उगीच."

"कांहीतरी उत्तर देऊन तुम्हीं आमची वंचना करीत आहांत."

" मी म्हणत होतें, या पोरीचें कसें होणार?"

"कां?"

"एकाहि गोष्टींत तिचें लक्ष स्थिर नाहीं. हा तिच्या बाल्याचाहि दोष आहे, हें मला कळतें. पण यमाकडे पाहिलें, म्हणजे त्या दोघांतले अंतर चट-कन् लक्षांत येतें"

विवस्वान् कांहीं न बोलतां सुदूर दिसणाऱ्या पर्वतराजीकडे दृष्टि लावून बसले. थोड्या वेळानें ते म्हणाले,

"तुझें म्हणणें मला मान्य आहे. पण तिच्यांत एकहि गुण नाहीं, असें का तुला वाटतें?"

" तसें नव्हे. तिच्यांत गुणहि आहेत."

" निश्चितच आहेत. तिचें अत्यंत भावनाशील अंतःकरण, हा एक फार मोठा गुण आहे तिच्याजवळ. तुला आठवतें?"

" काय?"

" यमाचा चौलसंस्कार. ती सबंध रात्र आणि त्यानंतर कांही दिवस ती रडत होती. कालपरवांची गोष्ट. एक किरात कांहीं पक्षी मारून घेऊन आला. त्या मृत पक्षांना पाहून तिनें जे हृदयस्पर्शी क्रंदन केलें, त्यानें माझेंहि क्षत्रिय अन्तःकरण क्षणमात्र द्रवलें."

" होय. आणखी एक गोष्ट. यमावर तिचें अत्यंत प्रेम आहे. त्याच्या-करितां ती काय वाटेल तें करायला सिद्ध असते."

" तर मग विश्वास असूं दे कीं, तिचें अमंगल होणार नाहीं. स्त्रिया पुत्रापेक्षां कन्यांच्या जीवनाची अधिक चिन्ता वहातात, कांहीं अयोग्य नाहीं

तें. तुझ्या मुलीच्या जीवनांत तिच्या अस्थिरतेमुळें वाटेल तसलीं आंदोलनें निर्माण झालीं, तरी तिची भावनाप्रवणता आणि प्रेम करण्याचें सामर्थ्य, या दोन वल्हयांच्या आधारानें तिची जीवननौका या उफाळलेल्या जीवनसमुद्रांतून निश्चितच सुरक्षितपणें पैलथडीस जाईल ! "

संज्ञादेवींनीं आपल्या नेत्रांतील आंसवें पुशीत म्हटलें,

" तसेंच होवो ! "

" तसेंच होईल ! " क्षितिजाकडे दृष्टि लावीत विवस्वान् म्हणाले.

  

सहा पावसाळे आले आणि गेले. यम आणि यमुना, या दोघांनी बाल्य मागें टाकून तारुण्याच्या प्रांतांत प्रवेश केला. पुढल्या शिशिर ऋतूंत एके प्रातःकालीं आश्रमासमोरील शेकोटीजवळ हीं चौघें शेकत बसली होतीं, तों एक वनचर धांवत आला, आणि विवस्वानांस साष्टांगप्रणिपात करून वन्य भाषेंत म्हणाला,

" देव ! एक विचित्र प्राणी इकडे येत आहे ! "

" काय म्हणालास ? "

" होय ! गाईसारखे चार पाय आहेत, पण शृंगें नाहींत ! लांबसडक शेपूट आहे, पण पाठीवर वशिड नाहीं ! आणि तो तुरुतुरु चालत इकडे येत आहे. त्यावर एक देव बसला आहे, तो आपणास पुसतो ! "

" अरे ! " विवस्वान् हंसून म्हणाले, ' " तो अश्व ! कोणीतरी अतिथि येत आहेसें वाटतें. जा, त्याला इकडे घेऊन ये. "

" पण देव ! " बुजऱ्या मुद्रेनें तो वनचर बोलला, " तो प्राणी- तो मला चावला तर ? "

" अरे ! तो चावणार नाहीं तुला. तू जा. "

थोड्याच वेळांत तो वनचर परत आला. त्याच्या मागोमाग एक अश्वारोही त्याचें अनुसरण करीत आश्रमापर्यंत आला. वनचर अश्वामध्यें आणि आपणामध्यें अंतरच ठेवून धांवत होता. त्याला वाटत होतें कीं देवांच्या म्हणण्याप्रमाणें हा प्राणी न चावला तर ठीकच आहे. पण विश्वाची परीक्षा पाहण्यापेक्षां चार पावलें, दूरच राहिलें, तर काय वाईट !

त्या अश्वारोहयास पहातांच विवस्वान तटकन् उठून उभे राहिले, व आश्चर्यानंदानें जवळजवळ ओरडलेच,

" कोण ? मित्रश्रेष्ठ चन्द्रापीड ? "

चन्द्रापीडांनीं अश्वावरून उडी टाकली, आणि धांवत येऊन विवस्वानांस मिठी मारली. पण दुसऱ्या क्षणीं ते विवस्वानांच्या बाहुबंधनांतून दूर सरले, आणि म्हणाले,

" मित्रवर! अगोदर मला माझें काम करूं द्या! आपणास नेमून दिलेला कार्यकाल संपला, असाल तसें बोलावलें आहे भगवान् इन्द्रांनी ! "

विवस्वानांना हें ऐकतांच धक्का बसला. पण चन्द्रापीडांचें तिकडे लक्ष गेले नाहीं. ते पुढें बोलूं लागले,

" ब्रह्मावर्तापासून नद्या आणि पर्वत ओलांडीत येथपर्यंत येत असतां अनेक ठिकाणीं आपल्या कीर्तीचा परिमल पसरलेला आढळला! हा देवानें आमचे स्वाधीन केलेला देश, आपण त्याचें सोनें केलेंत! बहुधा सर्व भूमि आपल्या आणि अनेकांच्या प्रयत्नांनीं फलदा झाली! जिकडे तिकडे निर्भय गायींचे कळप स्वच्छंदानें चरतांना दिसताहेत. मार्गभर आपण पेरलेलीं माणसें–हें काय? आपणास काय बरें नाहीं? मुद्रा विवर्णशी झाली ? "

" नाहीं नाहीं ! " भगवान् विवस्वान् सांवरून म्हणाले, "आपण स्नान-संध्या उरकून भोजन करा. आज शिशिर ऋतूंतील पौर्णिमा! हा वाढविलेला पसारा इथेंच ठेवून यांतून मुक्त व्हायला आजचा दिवस मोठा चांगला! सायंकाळीं प्रस्थान ठेवायचें ! "

भगवान विवस्वनांना त्रिविष्टांतून बोलावणें आलें, आणि ते आजच निघत आहेत ही वार्ता विजेच्या गतीनें भोंवतालच्या पर्वतकंदरांत पोंहोचली. अत्यंत व्याकुळ होऊन सहस्रसहस्र वनवासी, श्रमिक, कृषिक इत्यादि धांवत आश्रमाभोंवतीं गोळा झाले. जेव्हां ते आश्रमाजवळ पोंहोचले, तेव्हां त्यांनीं पाहिलें कीं, यमुना यमाला करपाशांत धरून हृदयस्पर्शी क्रंदन करीत आहे, आणि संज्ञादेवीहि मुकाट्यानें अश्रु गाळीत आश्रमाच्या द्वाराशीं उभ्या आहेत.

" आजपर्यंत माझ्याबरोबर आयुष्य कंठल्याचें हेंच फळ काय ?" विवस्वानांनीं संज्ञादेवींना विचारलें.

"नाहीं." डोळे पुशीत संज्ञादेवी म्हणाल्या, "पण पुत्रमोह मोठा कठिण आहे!"

"त्यापेक्षां कर्तव्यपालन अधिक कठिण आहे! सबंध जन्म संस्कृतीच्या संवर्धनांत व्यतीत झाला, आम्ही कृतार्थ झालों. आतां आमच्या मुलांनीं तेंच करायचें. दक्षिण देश अजून वनांनीं भरलेला आहे. यम इथें राहील! तो अत्यंत स्थिरबुद्धीचा, संयमी आहे. मला विश्वास आहे, की माझें राहिलेलें काम तो पूर्ण करील!"

तोंवर आश्रमाभोंवतीं एकत्र झालेला व्याकुळ समाज गोंगाट करूं लागला,

"देव! तुम्ही आम्हांला जगावें कसें तें शिकविलेंत! आता आम्हांस सोडून जाऊं नका! आम्हांस शेतें पेरायला तुम्ही शिकविलीत! वस्त्राचा उपयोग तुम्ही सांगितलात. गाई पाळायला आम्ही तुम्हांपासून शिकलों. वस्तु घ्यायची आणि द्यायची कला तुम्हांमुळें आम्हांस अवगत झाली. शस्त्रांचा उपयोग तुम्हांमुळें ठाऊक झाला. आतां आम्ही तुम्हांस जाऊं देणार नाहीं! नाहीं, नाहीं, नाहीं!"

विवस्वानांनीं हातानें खूण करतांच तो सर्व जमाव शान्त झाला. मुने-च्या मिठींतून यमास सोडवून विवस्वान् त्या समूहासमोर घेऊन ( आणि जड स्वरांत म्हणाले,

"माझ्या मित्रांनो! शांत व्हा! तुमच्या भावना मला कळतात. मीहि तुम्हांस सोडून जातांना मोठा सुखी नाही. पण मनुष्याच्या कर्तृत्वाला कांहीं मर्यादा असतात! माझा कर्तृत्वकाल संपला! आता आयुष्याचे उरलेले दिवस हिमगिरीच्या कुशींत कुठें तरी तपश्चर्या करीत मला व्यतीत करूं द्या! माझ्या ऐवजीं या माझ्या सद्‌गुणी पुत्रास मी तुमच्या स्वाधीन करून जात आहें. माझ्यावर प्रेम केलेंत तसेंच प्रेम या यमावर करा! कराल ना? आतां मला मन रिकामें घेऊन परत जाऊं द्याल ना? बोला मित्रांनो! बोला!"

सगळया समूहाचे ओलावलेले नेत्र खालीं वळले.

सायंकाळीं प्रस्थानाचा समय येऊन ठेपला. दिवसभर यमुना ओक्साबोक्शीं रडत होती. बंधुप्रेम आणि मातृप्रेम या दोघांचें अन्तर्द्वन्द्व तिच्या मनांत सुरू होतें. जेव्हां विवस्वान् शेवटची निरवानिरव करून बाहेर पडूं लागले, तेव्हां यमुना धांवतच त्यांच्या गळयांत पडली, आणि रडत रडत म्हणाली,

"तात !"

"काय बेटा ?"

"इथें दादा एकटा–"

"होय पोरी ! त्याला कांहीं उपाय नाहीं !"

"तात ! आई !"

"काय पोरी ?" डोळे लाल झालेल्या संज्ञादेवींनीं विचारलें.

"मी– मी रहातें दादाजवळ !"

"काय ?" आश्चर्याचा धक्का बसून संज्ञादेवी म्हणाल्या.

"होय !" भगवान् विवस्वान् म्हणाले, "मीहि दिवसभर विचार करीत होतों. शेवटीं या माझ्या लाडक्या कन्येनें मार्ग सुचविला ! विचारांच्या चक्रावर्तांतून हिनें मला सोडविलें ! देवि, यम विरक्त वृत्तीचा तरुण आहे ! कांहींतरी मायापाश असल्याशिवाय तो कार्य करूं शकणार नाहीं, विरक्तावस्थेंत तपश्चर्येस निघून जाईल ! यमुनेला अनुरूप पति आपण उत्तराखंडांतून पाठवून देऊं ! तुम्हाला यमुनेचाहि विरह सहन केला पाहिजे ! देवि ! माझ्या पत्नीला साजेल, अशा निर्मोही वृत्तीनें तुम्ही हा कन्यास्नेह तोडून मोकळया व्हा !"

क्षणभर संज्ञादेवी पांढऱ्या फटक होऊन जागींच खिळून उभ्या राहिल्या. दुसऱ्या क्षणीं पूर्वप्रकृतीवर येऊन त्यांनीं यमुनेला पोटाशीं धरलें, आणि तिच्या ललाटाचें चुंबन घेऊन त्या तिला यमाजवळ घेऊन गेल्या. तिला यमाच्या स्वाधीन करून त्या म्हणाल्या,

"यमा ! ही तुझ्यावर निरतिशय प्रेम करणारी बहीण मी तुझ्या हातीं ठेव म्हणून सोंपवीत आहें. जोंपर्यंत उत्तराखंडांतून हिचा पति येत नाहीं तोंपर्यंत तूं हिचें रक्षण कर !"

स्थिरबुद्धि यमानें यमुनेला जवळ घेऊन म्हटलें,

" माते ! तूं मजवर विश्वास ठेऊन अस ! प्राणापलीकडे मी हिचें जतन करीन ! "

विवस्वान् म्हणाले,

" आतां चलायचें. चन्द्रापीडा, आम्ही सिद्ध आहोंत ! "

" चला ! "

पुढें चन्द्रापीड, मध्यें संज्ञादेवी आणि मागें विवस्वान्, अशीं तीं तिघें आश्रमांतून बाहेर निघालीं, आणि यमुना " माते ! तात " अशी आरोळी मारून संज्ञाशून्य होऊन यमाच्या बाहूंत निश्चेष्ट होऊन पडली.

नरनारींचा तो प्रचंड समूह विलाप करीत त्या तिघांच्या मागोमाग चालला. बरेंच अंतर चालून गेल्यावर विवस्वान् मागें वळून म्हणाले,

" तुम्ही आमच्या मनांस स्थिर होऊं देणार नाहीं काय ? आतां थांबा ना ! "

समूह थांबला. थोड्याच वेळांत एका दरींत तीं तिघें दिसेनाशीं झालीं. स्फुंदत लोक घरोघर परतले.

  

पित्यानें सोंपविलेलें कर्तव्य यम मोठ्या दक्षतेनें पार पाडीत आहे.

नवनवी भूमि लागवडीस आणून तो ती तद्देशीय वनचरांच्या स्वाधीन करीत आहे. यमानें निर्दिष्ट केलेल्या मार्गानें प्रवास करीत ते वनचर नागरी सुसभ्य संस्कृतीशीं समरस होत आहेत. अजूनहि यमानें तातांनीं बांधलेला आश्रम सोडला नाहीं, उलट वनचरांच्या सहाय्यानें तो तेथील नैसर्गिक सौंदर्यांत भर टाकीत आहे. निर्झराचे शेजारीं त्यानें एक सुंदर मेघडंबरी आणि सौध बांधून घेतला आहे. नवनवीन वृक्षांचीं रोपें लावून तो आजूबाजूच्या वनश्रीची शोभा वाढवीत आहे.

आणि यमुना ?

तिचें यमावर अत्यंत प्रेम आहे. वनचरांच्या अनेक कन्या तिच्याशीं क्रीडा करण्यासाठीं येतात, पण तिला यमाचा सहवास अधिक सुखकर वाटतो.

माता व तात गेल्यावर कांहीं दिवस तिला अत्यंत जड गेले, पण आतां ती आपल्या दैनंदिन कार्यक्रमांत रुळली आहे. पाकगृहाचा भार सर्वस्वीं तिजकडे आहे. प्रतिदिवशीं नवनवीन भोज्य पदार्थ सिद्ध करून ती यमास अत्यंत आग्रहानें खाऊं घालते.

आणि अलीकडे तर यमाचा सहवास तिला अधिक हवासा वाटूं लागला आहे. यमाच्या अनिंद्यसुंदर मुखाकडे ती तासचे तास पहात बसते. यमासारखा बुद्धिमान आणि बलवान् तरुण त्या परिसरांत एकहि नाहीं, ही गोष्ट जेव्हां तिच्या लक्षांत येते, तेव्हां तिला अत्यंत अभिमान वाटतो.

एके दिवशीं यमानें यमुनेस विचारलेंहि. तो वनचरांशीं बोलत होता, आणि यमुना गवाक्षांतून बराच वेळ त्याच्याकडे पहात होती. वनचर निघून गेल्यावर यम आंत गेला, आणि यमुनेस म्हणाला,

" यमुने ! "

" काय दादा ? "

" माझ्या मुद्रेंत कांहीं विकृति निर्माण झाली आहे ? "

" छे ! तुला तसें वाटतें ? लोहदर्पण देऊ ? "

" नको. तू अलीकडे माझ्या मुद्रेकडे टक लावून पाहूं लागली आहेस म्हणून विचारलें "

आज, सर्वप्रथम, यमुनेच्या मनांत एक अननुभूत संवेदना निर्माण झाली ! ती आज पहिल्यांदा लाजली. गडबडून जाऊन ती म्हणाली,

" तुझें आपलें उगीच कांहीतरी ! मी तुझ्याकडे नव्हते पहात ! तुझ्यापलीकडील लतेचीं पुष्पें मोजीत होत्यें. ते असू दे खातोस का कांहीं ? आणूं ? "

यमुनेनें विषय बदललेला पाहून यम हंसला, आणि यमुनेकडे पहात तो बाहेर गेला.

यम गेल्याबरोबर यमुना आपल्या अंथरुणावर जाऊन झोंपली. तिचें विचारचक्र चालूं लागलें.

" आज असं का होतंय् हें ?

" माझ्या छातींत काय हुरहुरतंय् ?

" असं वाटतंय् कीं, यमाकडे सारखं बघावं ! खरंच वाटतंय् ! आतां पर्यंत हें मला जाणवलं नव्हतं ! आज जाणवलं ! आणि ही जाणीव होतां-क्षणींच मी कां लाजल्यें ?

" खरोखरीच यम मला अधिक हवासा वाटतो ! लहानपणापासून तो--मी एकत्र वाढलों, पण अलीकडे तो मला अधिक आवडूं लागला आहे ! "

" कां ?

" कोण जाणे ! पण त्याची पुष्ट छाती, भरदार बाहु, कमळासारखे नेत्र, ओठावर उगवणारी लव, प्रसन्न मुद्रा, हें सगळं मला हवं आहे ! अगदीं जवळ हवं आहे !

" पण मग मी मघां त्याच्याशीं खोटं कां बोलल्यें ?

" कोण जाणे ! ही गेली लाज मघांशीं कुणीकडून उगवली कुणास ठाऊक ! तिनं कांहीं मला खरं बोलूं दिलं नाही !

" खरोखरीच माझा--हो ! माझा दादा अत्यंत सुंदर आहे ! या सबंध प्रांतांत त्याच्यासारखा सुदर पुरुप दुसरा नाही !

" पण मघां माझ्या मनांत काय चमकून गेलं ?

" कांही का असेना ! तें अत्यंत सुखद होतं ! दादा मला म्हणाला, तूं माझ्या मुद्रेकडे टक लावून पहात्येस ! अन् मग ती संवेदना--पण ती आतां कां निर्माण झाली नाहीं ? "

असेच तिचे विचार कुठेंतरी भरकटत होते. संध्याकाळ झाली, दीप लावण्याचें तिच्या लक्षांतच आलें नाहीं. यम आश्रमांत आला, आणि आश्चर्यानें म्हणाला,

" यमुने, आज आश्रमांत दीप लावला नाहींस ? "

गडबडून जाऊन यमुना उठली, आणि म्हणाली,

" अरे दादा ! पडल्यें होत्यें, तों डोळा लागला ! " आतांहि ती खोटें बोलली.

दुसरे दिवशीं तिची वनचरी सखी वल्लरी आश्रमांत आली, आणि म्हणाली,

" देवी ! निर्झराच्या पलीकडे आमराईंत मधाचीं पोळीं लागलीं आहेत . वाढायला चलतां ? तुम्ही नुसत्या उभ्या रहा ! झाडांवर मी चढेन. "

यमास विचारून यमुना वल्लरीबरोबर बाहेर पडली.

वसन्तानें वनभर मायाबाजार मांडला होता. वृक्ष आणि लता नवनवीन कोमल पल्लवांनीं आणि पुष्पांनीं जणूं बहरल्या होत्या. आम्र, बकुल, चंपक इत्यादि वृक्षांवर विराजणाऱ्या फुलोऱ्यांवर मधमाशा गुंजारव करीत होत्या. कांही वृक्षांचीं पुष्पें रक्तवर्ण होतीं, तर कांहींचीं धूतवस्त्रांस लाजवितील, इतकी शुभ्र. वृक्षपर्णांनेहि वर्ण निरनिराळे. कांहींचा तांबूस तर कांहींचा हिरवा कांहींचा केशरी, तर कांहींचा पोपटी.

वसन्ताच्या त्या साम्राज्यांत या दोघींनीं प्रवेश केला, आणि त्या आमराईत पोहोंचल्या. ज्या झाडावर पोळीं होतीं, त्यावर वल्लरी चढली. यमुना खालून तिला मार्गदर्शन करूं लागली. तिचे नेत्र वर लागले असल्यामुळें आपण कुठे पाय देतों, याचें भान तिला उरलें नाहीं. झाडाखालीं एक लहानसें विवर होतें, त्यात तिचा पाय अडकला, आणि समोरील पाषाणराशीवर ती पडली. तिच्या एका गुडघ्यास थोडेसें लागलें, आणि दुसऱ्यास बराच मुका मार बसला.

मग कशाचीं पोळी आणि कशाचें काय! वल्लरी घाईघाईनें खालीं उतरली, आणि तिनें यमुनेला उचललें. वस्तुतः वेदना होत होत्या यमुनेला. पण तिच्याऐवजीं वल्लरीच रडूं लागली. आपण यमुनेला वनांत आणलें, आणि तिला लागलें, हीच गोष्ट तिला खात होती. कशीबशी तिची समजूत काढून तिच्या स्कंधावर भार टाकीत यमुना आश्रमांत येऊन पोहोंचली.

दारांतच यम उभा होता.

"हे काय?" त्यानें आकुळल्या स्वरांत विचारलें.

त्याच्या स्कंधावर हात ठेवून यमुना हंसत म्हणाली,

"मधमाशांनीं कष्ट करून एकत्र केलेला मध चोरूं पहाणारांना मिळालेलें प्रायश्चित्त!"

यमानें तिला धरून आंत नेलें. खरचटलेल्यावर औषधि लावून त्यानें विचारलें,

"दुसऱ्या पायास कितपत लागलें आहे?"

"मुका मार आहे, गुडघा शेकला म्हणजे बरें वाटेल."

रात्रीं यमानें यमुनेचा गुडघा शेकला, तेव्हां ती त्यास म्हणाली,

"दादा!"

"काय ग ?"

"माझें मस्तक चेपून देतोस का ?"

"कां ? दुखत आहे कीं काय ?"

यमानें आपला हात यमुनेच्या कपाळावर ठेवला. तो म्हणाला,

"यमुने, तुझें मस्तक तापलें नाहीं. तुला या गुडघ्याच्या वेदनांमुळें त्रास होत असावा."

यमुनेनें यमाचा हात आपल्या मस्तकावर दाबून धरला आणि ती म्हणाली,

"असूं दे. तूं असाच हात ठेवून बस. मला बरं वाटतंय."

थोडचा वेळानें ती यमाला म्हणाली,

"दादा, तुझ्या मांडीवर डोकें ठेवत्यें."

तिच्या स्वरांतला कंप यमाला जाणवला. तो आश्चर्यानें तिच्या मुखाकडे पहात म्हणाला,

"यमुने, तुला काय होतंय् ? निश्चितच कांहीं होत आहे तुला."

यमुना कांहीं न बोलतां यमाच्या कुशींत शिरली. तिनें आपलें मस्तक त्याच्या मांडीवर ठेवलें, आणि आपलें मुख हातांनीं झांकून घेतलें. तिला लाज वाटली. न जाणों! दादानें माझ्या मुखावरील भाव पाहिले तर!

यम तिच्या केशभारांतून हात फिरवूं लागला. त्याला वाटलें, आज पोरीला आईची आठवण झालेली दिसत्ये आहे आई दूर, उत्तराखण्डात, हिमालयाच्या सन्निध कुठेंतरी एकाद्या कुटींत तातांची सेवा करीत असेल, आणि ही पोर, केवळ माझ्यावरील तिच्या प्रेमामुळें इथें मजजवळ राहिली आहे! केवढा हिचा त्याग! केवढें मोठें मन! आतां तात आणि आई या दोघांच्या ठिकाणीं हिला मीच आहें! मी हिला प्राणांपलीकडे सांभाळीन! तातांनीं सांगितल्याप्रमाणें हिचा नियोजित वर येई तोपर्यंत! आणि त्याच्या हातीं हिला सोंपवीन, तेव्हां मी मातृऋणांतून मुक्त होईन!

पण यमुनेच्या मनांत उठलेलें वादळ–त्याचा एवढासाहि सुगावा यमाला लागता तर!

यमुनेनें यमाचा आपल्या केशभारांत फिरत असलेला हात आपल्या हातांत घेतला, आणि तो घट्ट दाबून धरला. तिला त्याच्या सान्निध्यांत अपरिमित सुख झालें. अनिर्वचनीय आनंदानें तिचें अंतर भरून आलें. त्याच आनंदाच्या समुद्रांत आपल्या मनाला मनसोक्त अवगाहन करूं देत यमुना बराच वेळपर्यंत तशीच पडून राहिली. शेवटीं यमाला पेंग येऊं लागली. तो म्हणाला,

" यमुने, आतां मी झोंपतों. "

सुखसमाधीचा भग झालेली यमुना म्हणाली,

" झोंपतोस ? बस ना रे दादा थोडा वेळ ! मला कसं बरं वाटतंय ! "

" नाही यमुने. उद्यां पलीकडील खोऱ्यांत भूमि प्रथमच नांगरली जाणार आहे. त्यावेळी मला तिथ उपस्थित असायला हवं आहे. प्रातःकाळीं लवकर उठायचं आहे. "

यम उठला आणि आपल्या अंथरुणावर जाऊन झोंपला. यमुना त्या सुखाची स्मृति चाखीत बराच वेळपर्यंत जागी होती.

सकाळी यम जागा झाला, त्यावेळी यमुना झोंपलेलीच होती. यमानें तिच्या शरिरावरील पांघरूण नीट सारखें केले. नंतर तिच्या सुंदर मुखाकडे पाहून तो निष्पाप, स्थितप्रज्ञ युवक प्रसन्न होऊन पुटपुटला,

" माझी यमुना ! किती सुंदर आहे ! हिला पतिहि हिच्याच सारखा मिळायला हवा ! "

स्नान उरकून व वृद्ध दासानें पुढें ठेवलेलें धारोष्ण गोदुग्ध पिऊन यम आश्रमाबाहेर पडला. कांही वनचर त्याची वाट पहात बसले होते. यमाला पाहतांच त्यांनीं मस्तकें लववून त्याला नमस्कार केला. प्रसन्न मुद्रेनें त्यांचा स्वीकार करीत यम त्यांच्याबरोबर दरीकडे निघाला.

वल्लरी यमुनेची प्रकृति पहाण्याकरितां आली, तेव्हांपर्यंत यमुना उठली नव्हती. बालभास्कराच्या किरणांनीं तिच्या शय्यागृहांत प्रवेश केला, आणि त्यांनीं तिचें प्रफुल्ल उत्पलाप्रमाणें भासणारें मुख प्रकाशित केलें, तेव्हां ती मदालसा जागी झाली.

तिचे नेत्र अजून जड होते. उठून बसून तिनें आळोखे पिळोखे दिले, आणि दाराकडे पाहिलें. तियें वल्लरी उभी होती. आज सर्वप्रथम यमुनेनें लाजून आपलें अंग वस्त्रांनीं नीट झांकलें. वस्तुत: वल्लरीपुढें लाजायचें कांहीं कारण नव्हतें. पण तिच्या अंत:करणात नवीनच प्रविष्ट झालेल्या त्या लज्जेने तिच्याकडून तो चाळा करविला.

वल्लरी यमुनेहून चारसहा वर्षांनीं मोठी होती. तिचा तो चाळा पाहून ती असंस्कृत पोरहि हंसली. यमुना कृतक कोपानें म्हणाली,

" हंसत्येस काय ग ? "

' देवी ! तुम्ही फार सुंदर दिसूं लागलां अहांत ! असं सौंदर्य आमच्या देशांत आढळायच नाही "

" जा ! तूं मोठी वाईट आहेस हंसलीस कां तें नाही सांगितलंस ? "

" उगीच हसल्यें ! "

वल्लरी थोड्या वेळानें निघून गेली, पण ती यमुनेच्या मनांतील अग्नि अधिकच भडकावून गेली. दिवसभर यमुना भ्रमिष्टासारखी व्यवहार करीत होती. तिला वाटे,

" मी सुंदर दिसूं लागल्यें आहे ?

" वल्लरी तसें म्हणाली.

" पण माझा दादाच अधिक सुंदर दिसूं लागला आहे ! खरोखरच !

" मला त्याची तहान लागली आहे ! असें वाटतें की--

" असें वाटतें की, तो आणि मी एक होऊन जावें ! त्याच्या चरणीं हें सर्वस्व वहावें ! त्याला पिऊन टाकावें, त्याची होऊन जावें !

" अहा ! कशी आग पेटली आहे ! काय केले म्हणजे ही आग शमेल ?

यमुनेच्या अंगावर सरसरून काटा आला. तिला वाटलें, आपला ओंठ करकचून चावावा

रात्रीं बराच उशीर करून यम घरीं आला यमुना त्याची वाट पहात दाराशीं बसली होती. भोजन उरकलें, आणि थकलेला यम आपल्या अंथरुणावर झोंपला. त्याच्या पलीकडेच चारपांच हात अंतरावर यमुनेचें अंथरूण होतें. यमाचा डोळा नुकताच लागत होता, तों त्याला असें वाटलें, की कोणी तरी आपल्या शेजारी दीप घेऊन बसलें आहे.

त्यानें नेत्र उघडले. त्याला असें दिसलें कीं, यमुना हातीं दीप घेऊन त्याच्या प्रकाशांत आपलें मुख न्याहाळून पहात आहे ! यम जागा झालेला पहातांच यमुना लाजून मागें सरली, आणि गडबडीनें म्हणाली,

"कांही नाहीं! तूं दिवसभर श्रमलास ना! म्हणून पहात होत्यें तुझें मुख."

यम प्रसन्न होऊन हंसला, आणि म्हणाला,

"कांही श्रमलो नाही मी! तूं झोंप आता यमुने.!."

पण यमुना कांही तिथून हलली नाही. तिचें शरीर कांपत होतें. थोड्या वेळानें ती कांपऱ्या, क्षुब्ध आवाजांत म्हणाली,

"दादा!"

"काय ग?"

"मला थंडी वाजत्येय्! तुझ्या पांघरुणांत येऊं का मी?"

यम उठून बसला. यमुनेच्या शरिरास हात लावून तो म्हणाला,

"ऊंहूं! तुझें अंग कांही उष्ण भासत नाही. पण तूं नाज बघूं! मी माझें पांघरूण तुला घालतो"

"तुझें पांघरूण नको मला!"

"मग?"

"मला–मला–" यमुनेनें यमाच्या कुशीत मस्तक शिरवीत म्हटलें, "मला तुझ्या पांघरुणांत येऊं दे!"

"छे छे! वेडी पोर ती! आतां तूं मोठी झालीस! मीहि मोठा झालों! आतां तें चांगले नव्हे!"

"पण लहानपणी––"

"लहानपण विसरून जा यमुने! ज्या त्या वयांत त्या वयाच्या मर्यादेनें वागायला हवें! ऊठ आपल्या अंथरुणावर झोंप आतां."

यम उठला. त्यानें यमुनेचा हात धरून तिला तिच्या अंथरुणावर निजविलें, आणि एका ऊर्ण वस्त्राचें पांघरूण घालून तो परत आपल्या अंथरुणावर येऊन झोंपला.

दुसरा दिवस उजाडला आणि मावळला, पण त्या सबंध दिवसांत यमुना अत्यंत अस्वस्थ होती. रात्रीं जेवणें उरकलीं.

पौर्णिमेचें चांदणें आकाशांतून खालच्या सृष्टीवर अमृत ओतीत होतें. त्याच्या स्वच्छ, नितळ प्रकाशांत आश्रमासमोर वनचरांच्या नेत्यांचा मेळावा भरला होता. यम त्यांना भूमीचा महिमा समजावून देत होता. तो म्हणत होता,

" भूमि आमची माता आहे! खरेंच ती आमची माता!

" आम्ही प्रतिदिवशीं तिच्यावर किती अत्याचार करतों! तिला खणतों, उकरतों, नांगरतों, पिस्कारतों, तुडवतों, तिच्यावर नाचतों, वाटेल ती घाण टाकतों.

" पण कधीं ती आम्हांवर रुष्ट झाली आहे का? कधीं तिनें आपल्या अंकावरून आम्हांला ढकलून दिलें आहे का? कधी आमचा तिरस्कार केला आहे का तिनें?

" नाहीं! कधींच नाहीं. कदाचित् आम्ही कुपुत्र असू. पण ती कुमाता नाहीं, कधींच नाहीं. ती अत्यंत उदार आहे, वत्सला आहे. ती सगळ्यांना ठाव देते. दुष्टांना आणि सुष्टांना! चांगले आणि वाईट दोन्हीं एकत्र हिच्या अंकावर नांदतात. हिच्या क्षमेला तुलना नाहीं.

"ती अत्यंत उदार आहे. पाऊस पडतो, तो झेलून ती नद्या वाहविते. आपल्या जलानें दोन्ही थडया परितृप्त करीत वाहणाऱ्या नद्या. पर्जन्याचें जल पिऊन भूमि गवत उगविते. गुरें तें खातात, आम्हांला दूध मिळतें.

" भूमीवर मूठभर धान्य पिस्कारावें, मग असंख्य कणसें कापून घ्यावींत, अशी हिची सृजनशक्ति. म्हणून भूमि स्वच्छ ठेवा. तिच्याशीं कृतज्ञ रहा. तिची नीट मशागत करा. तण उगवूं देऊं नका. खतपाण्यानें हिला तृप्त करा,

" आणि मग ही तुम्हांला उपाशी ठेवणार नाहीं!"

दोन प्रहर रात्र उलटली, मेळावा संपला. सगळे वनचर घरोघर निघून गेले. यम आश्रमांत शिरला, त्यानें पाहिलें, कीं, यमुना आपल्या शय्येवर तळमळत पडली आहे!

यम तिच्याजवळ गेला, आणि त्यानें आपला हात तिच्या मस्तकावर ठेवीत मायेनें स्निग्ध झालेल्या स्वरांत तिला विचारलें,

" यमुने! आईची आठवण कां होत्ये?"

तो त्याचा हात आपल्या छातीवर दाबून घरीत यमुना म्हणाली,

" दादा, एक काम करशील ? "

" काय ? "

" आपण दोघें निर्झरावरील मेघडंबरींत जाऊं. तिथें तूं मला वीणा वाजवून झोंपीव ! मी तुझ्या मांडीवर डोकें ठेवून झोंपेन. "

क्षणमात्र थांबून यम म्हणाला,

" चल ! "

थोड्याच वेळांत तीं दोघें आश्रमाबाहेर पडलीं. हातीं वीणा घेऊन यम पुढें चालला, आणि त्याचें अनुसरण करीत विव्हल यमुना त्याच्यामागें.

निशिकांत मध्यावरून पश्चिमेस कलला होता. करवंदी, कारवी, बकुल, इत्यादि पुष्पांचा धुंद सुगंध वातावरणांत जणूं कोंदून राहिला होता. दूर कुठें-तरी चक्रवाकी विव्हल स्वरांत आपल्या प्रियकराला साद घालीत होती, तिचा प्रियकर तिला प्रत्युत्तर देत होता. चहूंकडे पसरलेल्या निस्तब्ध शांततेंत त्या विरही जीवांचें तें परस्परांस आवाहन अंतःकरणाचा भेद करून पलीकडे जात होतें.

थोड्याच वेळांत तीं दोघें मेघडंबरींत पोंचलीं. निर्झराचा कलकल शब्द होत होता, त्याच्या स्वराशीं संवाद करीत यमानें वीणा लावली. यमुना त्याच्या मांडीवर मस्तक ठेवून झोंपली. यमाचें वीणावादन सुरू झालें.

तें वीणावादन म्हणजे जणूं काय सुस्वर असें सामगानच होतें. उदात्त, अनुदात्त आणि स्वरित, तिन्ही स्थानांस स्पर्श करीत स्वरलहरी विद्युल्लतेचा नाच नाचूं लागल्या. अनुदात्तापर्यंत त्या स्वरलहरी जाऊन पोंचत, तेव्हां असा भास होई कीं, ही स्वरगंगा सप्तपाताळांचाहि भेद करून या विश्वाचा ठाव घेणार आहे ! किंवा आकाशांतून निखळलेली उल्काच खोलीचा अंत मापायला निघाली आहे !

त्या उदात्तास स्पर्श करून पलीकडे झेंपावत, तेव्हां आकाशास स्पर्श करूं पाहणाऱ्या हिमाचलावरील राजहंसांच्या ऊर्ध्व दिशेकडील गतीची आठवण होई.

आणि स्वरित स्वरावर त्या स्वरलहरींचें आंदोलन चालतांना शांत सागरावरील इतस्ततः हेलकावणाऱ्या कल्लोळांचा भास होई.

थोड्या वेळानें यम थांबला, आणि त्यानें एकदम चक्रवाक चक्रवाकींच्या विरहकथा गाणारी एक गत वाजविण्यास प्रारंभ केला. आनंदानें धुंद होऊन तो आपलीं बोटें वीणेवरून नाचवूं लागला ! ती गत त्याला, केवळ त्यालाच स्फुरली होती. तो वाजवीत होता, तसतसें त्याला नवनवीन स्फुरत होतें ! वीणानादाशीं तो तन्मय होऊन गेला.

ती गत सुरू झाली, आणि यमुनेच्या हृदयाकाशांत जणूं काय वादळ उभें राहिलें. मध्यरात्र, एकान्त, निर्झराचा शेजार, फुलांचा धुंद सुगंध, मलयानिलाच्या शीतस्पर्शदायी झुळकी, आणि यमाचें सान्निध्य ! तिच्या अंतरांतील कामानल प्रज्वलित झाला, आणि तिनें तटकन् उठून यमाला कडकडून मिठी मारली !

यम थांबला. त्याच्या स्कंधावर तिच्या श्वासोच्छ्वासाचा उष्ण स्पर्शदायी वेग जाणवला. थरथर कांपत यमुना त्याला वारंवार कडकडून आलिंगीत होती !

यम तिला दूर करायचा प्रयत्न करीत म्हणाला,

"यमुने ! काय हें ! थांब यमुने ! शांत हो ! "

अस्थिर स्वरांत यमुना म्हणाली,

"दादा ! आतां कांहीं बोलूं नकोस ! या सुखात विघ्न निर्माण करूं नकोस ! "

ती पुन: त्याला करपाशांत धरून त्याच्या ललाटाचीं चुंबनें घेण्यास प्रारंभ करणार, तोंच यमानें निग्रहानें तिला दूर धरलें, आणि म्हणाला,

"यमुने ! स्पष्ट सांग बघूं ! हें तूं काय करीत आहेस ! "

"दादा ! मला हें एकटेपण आतां अगदीं असह्य झालें आहे ! तूं माझा स्वीकार कर ! "

काकुळतीच्या स्वरांत यम म्हणाला,

"यमुने ! काय म्हणत्येस हें ? तुला शोभतें का हें ? "

"शोभो अथवा न शोभो ! त्याची चिंता मी उद्यां करीन ! दादा या वेळेस तूं माझा हो ! सूर्य जसा पृथ्वीचा होतो, तसा ! दादा, ऐक माझें ! " असें म्हणून पुन: तिनें आपलें शरीर यमाच्या अंगावर झोकून दिलें.

"यमुने!" यम निग्रही स्वरांत म्हणाला, "तूं माझी पाठची बहीण! लहानपणापासून तुझ्यावर किती प्रेम केलें मी यमुने! आणि तूं मला हा भलता आग्रह करावास ना?" त्यानें तिचे बाहु धरून तिला समोर उभें केलें.

"भलता नाहीं रे दादा! भलता नाही! खरोखरच मला हा एकटे-पणा अगदीं गिळायला आला आहे! बहिणीचें अंतर समजून घे दादा! तुला सोडून दुसऱ्या कोणाची प्रार्थना करूं मी? म्हातार्‍या आचार्यांची करूं? तुझ्या त्या कृष्णवर्णीय वनचरांची करूं? आपल्या घरच्या दासाची करूं? सांग दादा! मी कुणाची होऊन राहूं? कुणाचें पत्नीपद स्वीकारायचा आग्रह करतोस मला? दादा! ज्या देशीं आपण राहतों त्या देशींच्या वन्य जातींत भाऊ बहिणीचा पत्नीत्वानें स्वीकार करीत नाहीं का? इथल्या संस्कृतीला हें अगदीं धरून आहे रे! आपद्धर्म म्हणून तरी माझा स्वीकार कर दादा! माझ्या अंतरांतील आग शांत कर!"

"यमुने! यमुने! वन्यसमूह इष्टानिष्टाचा विचार न करतां केवळ शरिराची भूक भागविण्यासाठीं जें करीत आला, त्याला संस्कृति म्हणत्येस कां तूं? संस्कृति शब्दाचा केवढा दुरुपयोग केलास यमुने! केवळ भावना-विवश होऊन तुला आणि मला नरकाच्या मुखांत ढकलूं नकोस. एकाच बीजापासून निर्माण झालेलीं भाऊ आणि बहीण जर परस्पराशीं रत झाली, तर तो त्यांच्या मातेचा किती मोठा अपमान होईल यमुने! अपमानाचें जाऊ दे! तात ज्या समाजाची रचना करण्यासाठीं जन्मभर कष्टले, आमच्या श्रेष्ठ ऋषिमहर्षींनीं आपल्या रक्ताचें पाणी घालून जो समाज जोपासला, त्याच्या मर्यादा तटातट तुटतील! जर केवळ कामवासने-चीच तृप्ति करण्यामागें समाज लागला, तर मग कोणी मातृत्वाचेंहि बंधन मानणार नाहीं! चहूंकडे रक्तपात माजेल यमुने! संकर हा विनाशाचा राजमार्ग आहे. आपल्या कुलाला अधःपाताकडे ओढूं नकोस!

"या समाजाच्या व्यवस्थेचें उत्तरदायित्व आपल्यावर आहे, हें ओळ-खून तरी असा अविचार करूं नकोस! लवकरच तुझा पति येईल, त्याच्याशीं विवाहबद्ध होऊन सुखाचा उपभोग घे! पण माझ्या मुखाला अशी काळोखी फासूं नकोस! हें कालत्रयींहि अशक्य आहे, यमुने! कालत्रयींहि!"

यमुना त्याच्या हातांतून स्वतःला सोडवून घेऊन पलीकडील ओटयावर पालथी पडली, आणि रडूं लागली. यम तिच्या जवळ गेला, आणि तिच्या पाठीवरून हात फिरवून तिला समजावूं लागला, तों यमुना अधिकच हुंदके देऊं लागली. सबंध रात्र अशीच व्यतीत झाली.

पूर्वेस आकाशाच्या कडा उजळ झाल्या. यम म्हणाला,

"यमुने! आश्रमांत चल! सूर्योदय व्हायला आला. चल बाळ!"

पण आतां यमुना मघांची राहिली नव्हती. ती झटकन् उठली, आणि वेगानें आश्रमाच्या विरुद्ध दिशेकडे पळूं लागली. यम हें पाहून आश्चर्यचकित झाला, आणि तिला म्हणाला,

"थांब यमुने! कुठें जात्येस?"

पळतां पळतां यमुना म्हणाली,

"दादा! तूं तुझ्या या दुर्गुणी ताईला विसर! तातांना आणि आईला निरोप पाठव कीं, तुमची कन्या कुलाला कलंक लावण्यापूर्वींच या जगांतून नाहींशी झाली! जा दादा! या तुझ्या लाडक्या यमुनेला शेवटची क्षमा कर! जा!"

मग यमाच्या लक्षांत आलें, कीं इथून अर्धा कोश अंतरावर एक पाता-ळाशीं गोष्टी बोलणारा कडा आहे. तिकडे यमुना धांवत आहे! त्यानें हातची वीणा फेंकून दिली, आणि झपाट्यानें तिचा पाठलाग करण्यास प्रारंभ केला-

मार्गांतील अडथळ्यांचा विचार न करतां यमुना पळत होती. तिला तिच्या नांवास लागूं पहाणारा कलंक पुसून टाकायचा होता. यमाला आपला जीव पणास लावून आपल्या भगिनीचे प्राण वांचवावयाचे होते.

दोघांतील अंतर कमी होत चाललें. कडाहि जवळ येत चालला. यमुनेच्या पायांतील शक्ति संपली. कड्याच्या ऐन तोंडाशीं पोंहोचतां वेळीं ती एका पाषाणाशीं टक्कर घेऊन खालीं कोसळली. यमानें चपळाई करून तिला धरलें.

तिला उचलून आपल्या करपाशांत घेऊन यम कड्याच्या तोंडावर असलेल्या पाषाणावर बसला, तों त्याला कड्याखालून गर्जना ऐकूं आली. त्यानें आश्चर्यानें खालीं बघितलें, तों काय!

बालसूर्याच्या किरणांत त्याच्या तातांचा अरुणध्वज हातीं घेऊन शंभर अश्वारोह्यांचा एक जमाव वाट चढत होता !

"यमुने ! तातांचा ध्वज ! तातांकडून अश्वारोही आले यमुने !

म्लानवदना यमुनेनें खालीं बघितलें, तों खरोखरच ! ती काकुळती करून यमाच्या हातून सुटायचा यत्न करीत म्हणाली,

"दादा ! मला माझें जीवन संपवूं दे ! "

"मुळींच नाहीं ! " यम तिला कड्यापासून दूर करीत म्हणाला, "मी तारक होऊं शकतों, मारक नव्हे ! "

"तर मग मला एक वचन दे ! कालची रात्र तूं आपल्या स्मृतींतून पुसून टाक ! तुझ्या बहिणीची ही लज्जादायी कहाणी तूं बिसरून जा ! "

"हें घे वचन यमुने ! तूं तुझ्या भावाला ओळखलें नाहींस, म्हणून हें वचन मागितलेंस ! चल घरीं ! तातांकडून आलेल्या अश्वारोह्यांचें स्वागत केलें पाहिजे. "

तीं दोघें आश्रमांत परतलीं. थोड्याच वेळांत ते शंभर अश्वारोही आश्रमाजवळ येऊन थडकले. यम आणि यमुना दोघेंही द्वाराशीं येऊन उभीं राहिलीं. वृद्ध चन्द्रापीड अश्वावरून खालीं उतरले. यमानें त्यांना खालीं वांकून नमस्कार केला. चन्द्रापीड त्याला उचलून आलिंगन देत म्हणाले,

"वत्सा ! तुझ्या तातांनीं एक वस्तु धाडली आहे."

" काय ? "

चन्द्रापीडांनीं मागें वळून खूण केली, तों एका अश्वावरून एक अत्यंत सुंदर युवक खालीं उतरून यमाजवळ आला. यमाचे हातीं त्याचा हात देत चन्द्रापीड म्हणाले

"तुझ्या भगिनीचा नियोजित पति ! "

यमानें एकवार प्रसन्न मुद्रेनें त्या युवकाकडे बघितलें, आणि मग मागें वळून यमुनेकडे पाहिलें. ती मृगनयना आपलें सलज्ज वदन खालीं वळवून उभी होती.

  

श्रावणाचा महिना. आज पौर्णिमा. विवाह होऊन यमुना सोवासटाकीं राहायला गेली, तेव्हांपासून यमाचे दिवस उदासवाणे जात होते. जेव्हां ती

जायला निघाली, तेव्हांच्या तिच्या उचंबळलेल्या भावना पाहून स्थितप्रज्ञ यमहि गहिंवरला. शेवटीं जेव्हां त्यानें दीपावलींत तिच्या घरीं जायचें मान्य केलें, तेव्हां कुठें रडें आवरून यमुना पतीबरोबर निघाली.

आज सकाळपासून पाऊस कोसळत होता, म्हणून यम आश्रमांतच बसून होता. दासी चार वेळां त्याला जेवायला उठण्याचा आग्रह करून गेली पण यम उठला नाहीं.

एकदम त्यानें पाहिलें कीं आश्रमासमोर उभ्या पावसांत आठ घोडेस्वार व एक पालखी येऊन उभी राहिली. तो चटकन् उठून सामोरा गेला, तों पालखींतून अलंकारांनीं सजलेली यमुना बाहेर आली, आणि तिने धांवतच येऊन भावाला बाहुपाशांत धरीन म्हटलें,

"दादा!"

"कां ग? आज मध्येंच आणि अचानक आलीस?"

"वा:! आज श्रावण पौर्णिमा नव्हे का!"

"मग?"

"दादा! चार दिवसांपूर्वी हे म्हणाले कीं, या दिवशी ज्यानें आपल्या बहिणीचा भार आपल्या शिरावर घेतला, त्याला बहिणीने रक्षा बांधायची असा संकेत आहे!"

"तिकडे कोणी भाऊ जोडावास कीं नाहीं?"

यमुनेच्या नेत्रांत टच्कन् आंसवें उभीं ठाकली. ती गहिंवरून म्हणाली,

"दादा? आकाशींचा चन्द्र, वनांतल्या देवता, आणि तो निर्झर हीं साक्षी आहेत! तूं या तुझ्या लाडक्या बहिणीला केवढ्या मोठ्या नाशापासून वांचविलें आहेस! तूं व ते साक्षीदार हे सगळे त्या प्रसंगात उपस्थित होते. त्या दिवशीं ही तुझी वेडी यमुना केवढी मूल्यवान् वस्तु नष्ट करीत होती, हें मलाच कळतें. कारण मी स्त्री आहें! माझा एवढा मोठा भार ज्यानें लीलया मस्तकीं वागविला, त्याला सोडून मी दुसरा भाऊ कुठें शोधायला जाऊं! कर हात पुढें!"

यमानें हात पुढें केला यमुनेनें त्या हातांत बांधलेली रक्षा त्या दोघांचींहि आंसवें पडून ओली झाली.

# भारतीचा भाऊ –

चारसहा सेवकांनीं खांद्यांवर वाहिलेलें तें धूड धप्पदिशीं राजप्रासादा-समोरच्या प्रांगणांत टाकून दिलें. तो मत्त वराह आज अनेक दिवस दुआबांतील पौरजनांच्या भयाचा विषय झाला होता. अनेकांची पिकली शेती त्यानें आपल्या मनगटाहून जाड पांढऱ्याफेक सुळयांनीं खुंदळून उध्वस्त केली होती. त्याशीं झुंज खेळतां खेळतां अनेकांना हा लोक सोडावा लागला होता.

त्या मृत वराहाचे मागोमाग पांढऱ्या शुभ्र राजस अश्वावर आरूढ झालेला पंजाबाधिप महाराज पोरस प्रांगणांत दाखल झाला. त्यानें अश्वा-वरून खाली उडी फेंकली, तेवढ्या धसक्यानें वराहाशीं झुंजतांना त्याच्या हाताला झालेला व्रण तात्पुरता बांधला होता, तो पुनः वाहूं लागला.

वैद्य आणि सेवकांची धांवाधांव सुरू झाली. लेप, पट्टया, लेह इत्यादि औषधिसमूह शोधला जाऊं लागला. पण स्थितप्रज्ञाच्या मनोवृत्तीनें त्या व्रणा-कडे दुर्लक्ष करीत शेजारीं उभ्या असलेल्या वृद्ध सामंतास पोरस म्हणाला,

"दलीपजी, किती वर्षांनंतर आज मनाजोगती मृगया करायला मिळाली ! आम्हांस वाटतें, असा वराह आमच्या देशांत क्वचितच आढळतो !"

"होय सम्राट ! तोंडदेखली स्तुति कशी ती मला करतांच येत नाहीं ! पण एवढें मात्र मी प्रतिज्ञेवर सांगेन कीं, एवढ्या प्रचण्ड वराहाची मृगया, आणि ती देखील त्याच्यासमोर घोड्यावरून उडी टाकून– ! अहाहा ! त्याच वेळीं मीं म्हटलें,-आपणापासून जवळच उभा होतों मी-तर मी म्हटलें–"

" काकाजी ! " दुसरा एक तरुण सामंत मध्येंच बोलला. सम्राट पोरसाच्या बरोबर वराहाशीं झुंजल्यामुळें त्याचींहीं वस्त्रें अस्ताव्यस्त झालीं होतीं. " काकाजी, जवळच म्हणजे हांकभर अंतरावरच ना ! "

" चूप रे ! एक एवढासा वराह मारलात, तर एवढा चढून जाऊं नकोस ! तुम्ही रांगतीं बाळें होतांत, तेव्हां आम्ही– तर काय म्हणत होतों मी सम्राट् ! हो एवढा मोठा वराह, म्हणजे देवदुर्लभ मृगया ! जोंपर्यंत आमच्यावर सम्राटांचें कृपाछत्र आहे-तें युगायुगीं असेंच राहो-तोंपर्यंत पंजाबकडे वांकड्या नजरेनें पाहण्याची कुणाची हिम्मत– "

दलीपजी आणखीही पुष्कळसें बोलला असता. त्याचा तसा संकल्पही होता. पण विधात्याचा संकल्प– !

त्या सर्वांचें लक्ष वेधून घेत एक स्त्रीवेषधारी परदेशीय, व त्याचे हात पाठीशीं बांधून त्याच्याबरोबर दोन सैनिक असे येऊन उपस्थित झाले. सम्राटां-समोर येतांच त्या सैनिकांनीं त्या स्त्रीवेषधाऱ्यास त्यांच्यापुढें प्रस्तुत करून त्यांच्यापैकीं एक म्हणाला,

" सम्राटांचा विजय असो ! हा आपल्या सेनाविभागांत अश्वांची मोजणी करीत हिंडत होता ! "

" अश्वांची मोजणी ? " आश्चर्यानें त्याच्या त्या विचित्र वेशाकडे निरखून पहात सम्राटांनीं विचारलें. तो परदेशीय आहे, हें त्याच्या मुद्रेवरू-नच स्पष्ट दिसत होतें. त्यानें केशांचें मुंडण केलें असून पंजाबी युवतीसारखीं वस्त्रें परिधान केलीं होतीं.

" होय सम्राट् ! त्याची भाषाही मोठी विचित्र आहे ! खूप बड-विल्यावर तो जें काय पुटपुटला, तें आम्हांपैकीं एकालाही उमगलें नाहीं. "

त्या परदेशीयाकडे रोखून पहात असलेल्या दलीपजींनीं तोंड वेडेंवांकडें करीत म्हटलें,

" काय पुराणांतील दानवांपैकीं आहे कोणी कीं, नागलोकांतून उत-रला आहे ! त्याला शेपूट आहे का पहा रे ? "

त्यांच्याकडे दुर्लक्ष करीत तो तरुण सामंत त्या स्त्रीवेषधाऱ्याजवळ गेला, आणि त्याचें मानगुट धरून त्याला म्हणाला,

"कोण तूं? बरें बोल! मजजवळ लटपटपंची चालायची नाहीं! मी मानच धडावरून उतरून ठेवून देईन!"

तोंच सम्राटांचा शब्द ऐकूं आला,

"त्याला मोकळा करा!"

सगळे आश्चर्यानें स्तंभित झाले. पण त्यांचें आश्चर्य द्विगुणित करीत सम्राट् पुढें म्हणाले,

"शिखंडीवर भीष्मांनीं बाण चालविले नाहींत, माहीत आहे ना? आम्ही पांडवांचे वंशज म्हणवितों, त्यांचें व्रत आम्हांला पुढें चालविलें पाहिजे!"

"क्षमा करा सम्राट्!" तरुण सामंत काकुळती करीत म्हणाला, "पण व्रतपालनानें हानि होत असली तरी --"

"तरी देखील आपल्या भूमिकेवरून तिळमात्र ढळतां कामा नये! त्यानें स्त्रीवेषाचा आश्रय केला, पंजाबाधिप पौरसाच्या राज्यांतील न्यायाचा अंकुश स्त्रीवेषापुढें बोथट होतो! जाऊंद्या त्याला!"

परदेशीय मुक्त केला गेला. सम्राट् म्हणाले,

"जा रे! तुम्ही दोघे याला आमच्या राज्याच्या पलीकडे घालवून द्या."

ते दोघे सैनिक त्या परदेशीयाला बरोबर घेऊन निघून जातात न जातात, तोंच सम्राटांचा एक विश्वासू गुप्तचर घोडा फेंकीत त्या प्रांगणांत येऊन दाखल झाला. घोड्यावरून उडी मारून त्यानें सम्राटांस प्रणाम केला, व म्हणाला,

"सम्राटांचा विजय असो! पश्चिम धूमावृत झाली आहे!"

"काय?"

"होय सम्राट! यवनाधिपाची अमाप सेना तक्षशिलेचें साम्राज्य पायांतळीं तुडवीत इकडे झेंपा घेत येत असलेली मी माझ्या डोळ्यांनीं पाहिली!"

"अरे म्हणतोस काय!"

"सम्राटांनीं या सेवकावर विश्वास करावा! गौरवर्णाचे, हातीं उंच भाले आणि लांब, चिचोळ्या तरवारी धारण करणारे, मुखें शिरस्त्राणांनीं

झांकलेले, अग्निवर्षाव करणारीं उल्हाट यंत्रें बरोबर असलेले असंख्य सैनिक बरोबर घेऊन भारत जिंकण्याच्या लालसेनें यवनाधिप तक्षशिला ओलांडीत आहे !"

पौरसाचे बाहु स्फुरण पावून उंचावले. मिशांवरून हात फिरवीत तो म्हणाला,

"अस्सें ! तर मग मघांचा स्त्रीवेषधारी यवन गुप्तचर होता म्हणायचा ! दलीपजी, आज सकाळींच हा वराह आमच्या शस्त्राला बळी पडला, हा शुभशकुन म्हणायचा! पण कायरे?" गुप्तचराकडे वळून पौरस बोलला, "तूं हें सगळें दृश्य आपल्या डोळयांनीं पाहिलेंस ?"

उत्तर दिलें तें सम्राटाच्या थोरल्या भगिनीनें, सावित्रीदेवीनें. पौरसासारखीच भव्य, तेजस्वी स्त्री; पण पतिनिधनापासून व्रतें करून कृश झालेली पौरसाजवळ येत ती म्हणाली,

"भैया ! तूं मजवर तर खचितच विश्वास ठेवशील !"

सगळे जण आदरानें बाजूस झाले. बहिणीवर अकृत्रिम प्रेम असलेला पौरस म्हणाला,

"वा ! जीजी, तुझ्यावर अविश्वास करून मी माझें अकल्याण करून घेणार नाहीं !"

"तर मग ऐक, मघांच मजकडे वार्ता आली, कीं तक्षशिलाधिप आंभीराज--"

"त्याचें काय झालें ?"

एक उसासा टाकून सावित्रीदेवी म्हणाली,

"कोण जाणे, आमची ही मातृभू असे कुपुत्र कां प्रसवते! केवळ स्वत:चे तुच्छ प्राण सुरक्षित रहावेत, म्हणून जो मनुष्य सबंध देशाचें भाग्यचक्र एका परकीयाच्या हातीं लीलया सोंपवून देतो-" सावित्रीदेवी थांबली, आणि तिनें आपला अधर दातांखालीं दाबला.

"जीजी !" अधीर पौरसानें विचारलें, "काय आम्भीराज यवनास मिळाला ?"

"केवळ मिळून गप्प बसता, तर बरें होतें! तो यवनाधिपाचा मार्गदर्शक झाला आहे! आतां या सस्यश्यामल देशाची ही शांति, ही समृद्धि, हें सुख-यवनांच्या उन्मत्त घोड्यांच्या टापा हें सगळें तुडवून टाकतील! आज आपापल्या घरीं सुखानें नांदणारीं कुटुम्बें, स्त्रिया, बाळें-अहा! या रणधुमाळीत त्यांचें काय होईल देव जाणे!" संतापाचीं दोन आंसवें तिच्या नेत्रांतून निखळलीं.

पोरस क्षुब्ध होऊन इतस्ततः फेऱ्या घालूं लागला. मध्येंच थांबून त्यानें विचारलें,

"जीजी! तुला कळलेली वार्ता सांगशील का?"

"ऐक! पश्चिमेस दूर, खूप दूर, सूर्य मावळतो, त्या बाजूला या यवनांचा देश आहे. तिथून बरोबर प्रचण्ड सेना घेऊन जग जिंकण्याच्या हेतूनें त्यांचा राजा देशोदेशीची समृद्धि पायतळी खुंदळीत निघाला आहे. हें आक्रमण सामान्य नव्हे भय्या! भारतीय संस्कृतीच्या जीवनमरणाचा प्रश्न आहे हा! आणि भारताच्या प्रवेशद्वाराची राखण करायचें काम देवानें आपल्याकडे सोंपविलें आहे! केवढें आपले भाग्य! सबंध भारताच्या संस्कृतीचे आपण पहारेकरी! चहूंबाजूंनी दुर्लंघ्य असलेला हा भारतवर्ष, त्याचें जें एकच एक प्रवेशद्वार, तिथ देवानें आपली योजना केलेली! भय्या! केवळ या एका कृपेबद्दल आपण देवाचे आभार मानले पाहिजेत!"

"थांब, जीजी थांब! ऐक तुझ्या भय्याची प्रतिज्ञा! हें यवनांचें आक्रमण मी माझ्या बाहुबलानें अवश्य थोपवून धरीन! यश आलें, आनंदाची गोष्ट! अपयश आलें, आणि रणांत धारातीर्थी पडून देवाघरीं रुजूं झालों, तर कमीत कमी माझें कर्तव्य मीं केल्याचें समाधान तरी मला लाभेल! देवापुढें ताठ मान करून मला उभें राहतां येईल!"

  

सिंधु नदीला पंजाबांत दरिया हें नांव कांहीं विनाकारण मिळालें नाहीं.

अत्यंत विस्तीर्ण, वेगवान्, तळाचा थांग न लागणारा असा तो प्रवाह पंजाबवासीयांच्या विस्मयाची आणि आदराची वस्तु होऊन राहिला आहे.

सिंधु दरिया हा त्यांचा अन्नदाता, तोच त्यांना जल पुरविणारा. पंजाबांतील अमाप पीक प्रसविणारीं गव्हाचीं शेतें सिंधुदरियाच्या पाण्यावरच पिकायचीं. त्यामुळें गांवोगांवचे लोक देवभावानें त्या महानदाची पूजा करीत हें कांहीं फारसें आश्चर्य मानायला नको.

पण आज तो एवढा विस्तीर्ण प्रवाहही लहान भासावा, अशी एक अकल्पनीय घटना त्याच्या तटाकावर घडत होती.

सहस्रावधि नावांतून जगज्जेत्या शिकंदराचें अमाप सैन्य सिंधुनदाच्या वायव्य तटाकावरून भारतांत पाऊल ठेवीत होतें.

वायव्य तटाक घोड्यांच्या हिर्णाहिणण्यानें आणि स्वारांच्या आरड्याओरड्यानें निनादून गेला होता. आकाशांत तळपणाऱ्या सूर्याच्या तीव्र प्रकाशांत चम्चम् चमकणाऱ्या भाल्यांच्या फाळांचीं प्रतिबिंबें पाण्यांत पडून तें मूळचें हिमालयांतलें तेजस्वी पाणी अधिकच तेजस्वी दिसत होतें.

ग्रीक भाषेंत आज्ञा होत, "नावांत चढा!"

भराभर ग्रीक सैनिक नावांत उड्या मारून आपापल्या घोड्यांचे लगाम हातीं धरीत. वल्हीं सप्सप् ध्वनि उमटवीत चालूं लागत. सुकाणूंच्या दिशा बदलल्या जात, आणि ते सैनिक ऐलथडीला उतरविले जात.

पाण्याचा एवढा मोठा प्रवाह पोहून आल्यामुळें धापा टाकीत असलेल्या घोड्यांना थोडा वेळ विश्रांति मिळे, पुनः खोगिरें कसलीं जात, आणि त्यानंतर घोडदौड सुरू होई. सिंधुनदापासून दोन मैल अंतरावर त्या सैन्याचा पडाव पडला होता.

आपल्या विशाल सेनेचा हा जलप्रवास कौतुकानें न्याहाळीत ऐलथडीवरील एका प्रचंड वृक्षाखालीं जगज्जेता अलेक्झांडर उभा होता. गर्वानें त्याचें अन्तःकरण भरून आलें होतें. एवढ्या प्रचंड सेनेचें आधिपत्य, ही निःसंशय गर्व करण्याजोगीच गोष्ट होती. त्यांत जवळजवळ अनिर्बंधपणें ग्रीसपासून येथपर्यंतचा प्रांत पायतळीं तुडवीत आल्यामुळें शिकंदराच्या आत्मसन्मानाला विलक्षण धार चढली होती.

त्याच्या मस्तकावर टोंकदार शिरस्त्राण होतें. त्याचे पुष्ट बाहू पोलादी बाहुबन्धनांनीं बांधलेले होते. अंगांतल्या रूमक भरजरी अंगरख्याच्या मागें

पायांखालीं रेंगाळणारा झब्बा लोंबत होता. पायांत सुवर्णाचें काम केलेलीं पादत्राणें गुडघ्यापर्यंत पट्ट्यांनीं आवळलीं होतीं. चबाबदार मुद्रेचा शिकंदर आपणामागें लघळपणें उभ्या असलेल्या आम्भीराजाकडे दुर्लक्ष करून सेनेचा तो जलप्रवास अवलोकीत होता.

एकदम मागें वळून त्यानें अधिकारनिदर्शक स्वरांत आम्भीला विचारलें,

"या नदाला काय पांच नद्या मिळतात ?"

"होय स्वामी ! आणि त्या नद्या –"

"तें असू दे ! यांचा उगम कुठें होतो ?"

"हिमालयांत स्वामी !"

"त्यावर काय नेहमी बर्फ असतें ?"

"होय स्वामी ! फार बर्फ असतें स्वामी ! तें नेहमी वितळतें स्वामी !"

"लक्षांत ठेवा ! माझी फारशी स्तुति केलेली मला आवडत नाहीं. वारंवार स्वामी म्हणत जाऊं नका. या तुमच्या देशांत सगळे लोक काय तुमच्यासारखेच आहेत ?"

"होय स्वामी –"

"काय ?"

"नाहीं स्वामी !"

शिकंदर मोठमोठ्यानें हंसला त्याच्यामागें उभे असलेले सरदारही मुखें हातांनीं झांकून घेऊन हंसूं लागले.

"शकुन कांहीं मोठा चांगला झाला नाहीं. प्रारंभींच तुझ्यासारखा लाळघोट्या भेटला. मला माझ्याशीं ताठरपणानें झुंज घेईल, असा कोणीं भेटायला हवा आहे. निष्कंटक पृथ्वी, हें कांहीं पराक्रमी पुरुषाला मोठेंसें आकर्षण नसतें. त्याला पाहिजे असतें युद्ध ! त्याला पाहिजे असते लढत ! प्रतिकारहीन पृथ्वी पादाक्रांत करण्यापेक्षां मला जर युद्ध करून एक गांवच मिळवितां आला, तर तो हवा आहे !"

आम्भीराजा चरफडत मनांतल्या मनांत म्हणाला, "तुला तुझी इच्छित वस्तु इथें मिळेल !"

शिकंदराला वाटलें, आपण एका अयोग्य माणसासमोर फार बोललों म्हणून तो कांहीं वेळ स्तब्ध राहिला. नंतर एकदम मागें वळून तो एका ग्रीक सरदाराला म्हणाला,

"हेलिओदरस ! आमची बिनीची तुकडी पुढें पोरसच्या राज्यांत जाऊं द्या. त्याला पत्र लिहा कीं, जगज्जेता शिकंदर आपला सेनासमुद्र घेऊन तुझ्या पाहुणचाराचा स्वीकार करण्यास येत आहे !"

हेलिओदरसनें मान वांकविली, आणि तो नेमल्या कामावर निघून गेला.

थोड्याच वेळांत शिकंदरच्या फौजेच्या पडावावरून नाना रंगांचीं निशाणें आणि शस्त्रें, यांनी सजलेले एक पथक दौड करीत सतलज-कडे निघालें.

  

पोरसचा दरबार भरला होता.

सिंहासारखा खवळलेला पोरस आपल्या सिंहासनाच्या हातावर मुठी आपटीत होता.

गर्वानें सगळ्या दरबाराकडे तुच्छत्वाचा निदर्शक कटाक्ष टाकीत हेलिओदरस म्हणाला,

"आम्हांला लवकर परत जायला हवे. आपलें उत्तर ऐकायला आम्ही उत्सुक आहोंत !"

तोंच एक सेवक अन्तर्भागांतून पोरसाच्या सिंहासनाजवळ येऊन उभा राहिला, त्यानें आदरानें खालीं वांकून तोंडावर वस्त्र धरीत पोरसला काहीं-तरी सांगितलें. लगेच पोरस उठून उभा राहिला. पोरस उठला, हें पाहतांच सबंध दरबार उठला. काहीं क्षणांतच अन्तर्भागाकडे असलेल्या द्वारांत सावित्रीदेवी येऊन उभ्या ठाकल्या. सगळ्या दरबारानें तिकडे एकवार पाहून माना खालीं लवविल्या.

"जीजी ! हे यवन सैनिक आमचें उत्तर ऐकायला उत्सुक आहेत !" पोरस म्हणाला.

हेलिओदरस त्या तेजस्वी स्त्रीच्या गंभीर मुद्रेकडे टक लावून पहात उभा राहिला होता. त्याला उद्देशून सावित्रीदेवी म्हणाल्या,

" यवनाधिपतीला जाऊन सांगा कीं, भारताच्या प्रवेशद्वाराचें रक्षण करण्याचें काम विधात्यानें आम्हांकडे सोंपविलें आहे, आमचीं पाजळलेलीं शस्त्रें तुमच्या स्वागतास सिद्ध आहेत ! "

दुभाष्यानें हा मजकूर हेलिओदरसला समजावून सांगतांच त्याची मुद्रा बदलली. तो ओरडत म्हणाला,

" जगज्जेत्या सम्राट शिकंदरांना असलें उत्तर ऐकायची संवय नाहीं! लवकरच या पेरलेल्या विषबीजाचीं फळें तुम्हांला चाखायला मिळतील ! "

पोरस घनगंभीर स्वरांत बोलला,

" यवनाधिपाच्या दूताकडून आम्ही याहून अधिक चांगल्या वागणुकीची अपेक्षा करीत आहोंत ! "

दणादण पाय आपटीत हेलिओदरस आणि त्याच्या बरोबरचे सैनिक दरबारांतून निघून गेले

पोरस मंत्र्याकडे वळून म्हणाला,

" सामंत ! भांडारें उघडी करा ! ज्या सैनिकांजवळ घोडे नाहींत त्यांना घोडे खरेदी करूं दे. शस्त्रें नसतील त्यांना शस्त्रें द्या. गजशालेंतील हत्तींचा खुराक दुप्पट वाढवा ! त्यांना बांधून ठेवा ! कोणाला काय लागेल तें द्या ! आणि सर्वांना सांगा कीं, ज्याला त्याच्या या देशाच्या पावित्र्याची, प्रतिष्ठेची चाड असेल, त्या प्रत्येकानें आजपासून चौथ्या दिवशीं राजप्रासादासमोरील मैदानांत शस्त्रास्त्रांनिशीं एकत्र यावें. यवनसेनेला इकडे येण्यास कमींत कमी आठ दिवस लागतील. नदीवरील चौक्या अधिक वाढवा. पलीकडे येणें जाणें निर्बंधित करा. राजाज्ञेशिवाय कोणास येऊं जाऊं देऊं नका ! हें सगळें आजच्या आज झालें पाहिजे ! "

त्या गंभीर वातावरणाचा आपल्या किरट्या आवाजानें भेद करीत वृद्ध दलीपजी म्हणाला,

" महाराज ! यवनसेना समुद्रासारखी आहे ! तक्षशिला, गांधार या राज्यांचे बंधारे त्या सेनेपुढें कोलमडून पडले ! तिथें आमचा काय पाड– "

"दलीपजी! हें आपणच बोलत आहात काय? गवताचा पर्वत असला, तरी त्याचा नाश करायला अग्नीची एक लहानशी ठिणगीही पुरेशी होते, हें विसरलांत काय?"

"पण महाराज! पर्वतप्राय अग्नीचाही टिकाव सागरापुढें लागत नाहीं–"

"लागतो! अवश्य लागतो! प्रतिदिवशीं समुद्राच्या पोटांतला वडवानल बारा गांवें समुद्र चाटून टाकीत असतो! जर नद्या समुद्रांत सारखं पाणी आणून न ओतत्या, तर आजपर्यंत समुद्राच्या ठिकाणीं भलें मोठें वाळवंट झालें असतें! आणि अधिकाधिक काय होईल? आम्ही नष्ट होऊं! क्षत्रियांनीं जगण्यामरण्याची चिंता करावयास केव्हांपासून प्रारंभ केला?"

"तसें नव्हे महाराज!"

"तर मग या समुद्राशीं झुंज द्यायचें. त्याला असें चुकूनही वाटतां उपयोगाचें नाहीं कीं, हा भारतवर्ष शेळ्यामेंढ्यांचा देश आहे! इथें चित्ते, सिंह राहातात! स्वाभिमानी, तेजस्वी! मरणापावेतों झुंज खेळणारे!"

सगळा दरबार विस्मयानें थक्क झाला.

  

पण पोरसचा अंदाज चुकला.

शिकंदरास सतलजच्या पलीकडील तटाकावर येईपावेतों एक महिना लागला. तोंपर्यंत पावसाळा सुरू झाला. नद्या नाले दुथडी भरून वाहूं लागले. सतलजचें पाणी दोन्ही तटाकांस खालीं दाबीत वेगानें सिंधुनदाकडे धांवूं लागलें.

पोरसानें युद्धाची सिद्धता केली, आणि तो सतलजचें पाणी कमी होण्याची वाट पहात बसला. शिकंदराला अलिकडे येऊं न देतां पलिकडेच झुंज घ्यायचें, असा साहसी बेत त्यानें केला.

अर्धे जग जिंकीत आलेला शिकंदर या नदीचा आलेला अडथळा पाहून कांहींसा विमनस्क झाला. पोरसाचें आव्हान ऐकून त्याला परम संतोष झाला होता. पण मध्येंच सतलजला पूर आला. सिंधुनदावर मिळाल्या तेवढ्या नौकाही इथें मिळणें शक्य नव्हतें. तरी त्यानें शेंकडों सुतार कामाला बसवून

नाथा तयार [illegible]ास प्रारंभ केला होता. स्वस्थ बसणें त्याच्या स्वभावाच्या विरुद्ध होतें.

होतां होतां श्रावण महिना सुरू झाला. पौर्णिमा उगवली.

पंजाबी रमणींचें सिंधुनदावर फार प्रेम. त्या त्याला आपला भाऊ समजत. म्हणून बहुधा सर्व स्त्रिया सिंधुनदाला रक्षाबंधनाचे दिवशीं राखी अर्पण करीत. ज्यांना प्रत्यक्ष सिन्धुनदावर जाणें शक्य नव्हतें, त्या सतलज, रावी, बियास या नद्यांच्या हातें आपल्या त्या आवडत्याला राखी पाठवीत.

पौर्णिमेस सकाळपासून पावसानें झड लावली होती. सावित्रीदेवी एका तबकांत राखी घेऊन एका दासीबरोबर उभ्या पावसांत भिजत सतलजवर निघाली. नगराबाहेर नदीच्या कांठीं तिचा एक आवडता वटवृक्ष होता. दरवर्षी ती त्या वटवृक्षाजवळ बसून मोठ्या स्नेहभावानें सिंधुनदाची सखी म्हणून सतलजची पूजा करी आणि तिला राखी अर्पण करून म्हणे,

"माई ! माझी एवढी राखी माझ्या भावाला दे !"

यंदांही ती त्या वटवृक्षाजवळ पोंचली दरवर्षीपेक्षां यंदा सतलजचें पाणी अधिक वाढलें होतें. सगळा कांठ निसरडा झाला होता. तरी धैर्यानें सावित्रीदेवी जाववेल तिथपर्यंत पाण्याजवळ गेली. तिनें षोडशोपचारांनीं सतलजची पूजा केली, आणि तिला म्हणाली,

"माई ! माझ्या भय्याला सांग, पुढील वर्षी कदाचित् ही तुझी बहीण तुला राखी बांधू शकणार नाहीं ! कारण यवनसेनेच्या पायदळीं बहुधा हा सर्व प्रांत तुडवला जाईल !"

तिच्या डोळ्यांत आंसवें उभीं राहिलीं. पण वरून पडणाऱ्या पावसाच्या धारांबरोबर तीं तिनें गिळून टाकलीं.

हें दृश्य पहात एक तरुण त्या वटवृक्षाच्या पलीकडे उभा होता. त्याच्या शरिरावरील वेष भारतीय होता. त्याच्यामागें त्याचा एक अनुचर उभा होता. अशा मुसळधार पावसांत एक स्त्री हातीं पूजासंभार घेऊन नदीवर आलेली पाहून त्याचें कुतूहल जागें झालें. तो सावित्रीदेवीच्या निकट येऊन तिची पूजा बघूं लागला. तिची शांत पवित्र मुद्रा पाहून त्याला मोठें बरें वाटलें.

जेव्हां सावित्रीदेवी त्या घसरगुंडींतून सतलजच्या पाण्यांत राखी सोड-ण्यास पुढें जाण्याची धडपड करूं लागली, तेव्हां घाईघाईनें पुढें होऊन हा तरुण अशुद्ध भाषेंत म्हणाला,

" माई ! थांबा ! "

सावित्रीदेवी चमकून त्याच्याकडे पाहूं लागली. तो तरुण जवळ येऊन म्हणाला " प्रवाह भयंकर आहे, जर तुमचा पाय घसरून तुम्ही पाण्यांत पडलां, तर मग तुम्हांला काढणें मला जड जाईल. त्याऐवजीं तुम्ही जें काय करीत आहां, त्यांतच मी तुम्हांला मदत करतों म्हणजे झालें. "

सावित्रीदेवीनें त्या तरुणास न्याहाळलें. त्याची रुबाबदार शरीरयष्टि आणि भव्य, रेखीव मुद्रा पाहून तिला संतोष झाला. तिनें त्याला विचारलें,

" मुला तूं कुठला ? "

" मी ? मी एक परदेशी आहें. इथें युद्ध होणार असें ऐकतों. म्हणून या देशच्या राजाच्या पदरीं नोकरी मिळाल्यास पहावी, म्हणून आलों आहें. तें असूंदे. हें तुम्ही काय करीत अहांत ? "

" मी सिंधुदरियाला राखी धाडीत आहें. "

" कां ? "

" तो आमचा भाऊ आहे. आज भावाच्या हातांत ही राखी बांधा-यची असते. "

" म्हणजे भाऊ काय करतो ? "

" तो बहिणीच्या बऱ्यावाइटाचा भार आपल्या मस्तकीं धारण करतो. बहिणीच्या संकटकालीं धावून येतो. सिंधुनद आम्हां पंजाबणींचा प्राणदाता. त्याला आम्ही आज राखी धाडीत असतों. "

तो तरुण ही प्रथा ऐकून मोठा प्रसन्न झाला, आणि म्हणाला,

" माई, तुम्हांऐवजीं तुमचा प्रतिनिधि म्हणून ही राखी मीं सतल-जच्या पाण्यांत वाहवून दिली. तर नाहीं का चालायचें ? "

" हो ! चालेल कीं ! "

" तर मग इकडे द्या ती राखी ! "

त्या तरुणानें ती राखी हातीं घेतली, आणि क्षणभर उभा राहून पुन: म्हणाला,

" माई ! ही राखी जर मी हातीं बांधली तर ? "

" तर ? " सावित्रीदेवी हंसून म्हणाली, " तर मग मजवर जेव्हां संकट येईल, तेव्हां तुला धांवून यावें लागेल !

" एवढेंच ना ! तुमच्यासारख्या बहिणीचा लहान भाऊ म्हणविण्यांत मला मोठा संतोष वाटेल. ही राखी मीच माझ्या हातांत बांधून घेतों. " तरुणानें ती राखी आपल्याच हाताभोंवती गुंडाळली.

" पण बाबा रे ! मजवर संकट आलें, तर मी तुला कुठें शोधायला जाऊं ? " सावित्रीदेवी म्हणाली.

काही क्षण विचार केल्यावर त्या तरुणानें आपल्या हातांतील अंगठी काढून ती सावित्रीदेवीच्या हातीं दिली तो म्हणाला,

" माई ! मघां मी तुझ्याशीं खोटें बोललों. हें नदीपलीकडे यवनसैन्य पसरलें आहे. यापैकीं कोणालाही तूं ही अंगठी दाखव. तो तुझा निरोप मजकडे पोचवील ! "

आश्चर्यानें स्तंभित होऊन सावित्रीदेवी म्हणाली,

" तूं कोण आहेस ? "

" मी या यवनसेनेंतला एक लहानसा सरदार आहें. या राजाच्या सेनेची रचना पहाण्यासाठीं इकडे आलों होतों. "

" कसा आलास बाबा तू ? नदीवर तर पहारे बसविले आहेत ! "

" माई ! पहारेकरी नावांवर लक्ष ठेवतात. पोहणारा माणूस त्यांच्या नजरेंत येत नाहीं. "

आश्चर्याचा आणीक एक धक्का बसून सावित्रीदेवी म्हणाली,

" एवढें मोठें वेगवान् पाणी तूं पोहून आलास ? "

" होय माई. आणि आतां चाललोंही. सगळें जग पादाक्रांत करणाऱ्या शिकंदराच्या सरदाराला या गोष्टीचें कांहीं एवढें मोठें कौतुक नाहीं ! "

असें म्हणून त्या तरुणानें दुथडी भरलेल्या त्या दुर्लंघ्य सतलजमध्यें उडी टाकली. त्याच्या अनुचरानें त्याचें अनुकरण केलें. क्षणार्धात ते दोघे दिसेनासे झाले.

दासी म्हणाली,

" काय विचित्र भाऊ जोडलात हा ?"

" त्याहून विचित्र त्याचें हें साहस आहे ! कोण जाणे पुढें काय होणार आहे ! अशा साहसी शत्रूशीं झुंज आहे !" सावित्रीदेवी पावसाच्या सरींतून त्या दोघांना न्याहाळण्याचा प्रयत्न करीत म्हणाली.

  

चिंताक्रान्त सावित्रीदेवी आपल्या महालांतील विष्णुमूर्तीसमोर बसली होती. युद्धभूमीवरून सारखे संदेशामागें संदेश येत होते खरे, पण प्रत्येक संदेश पहिल्यापेक्षां अधिकच वाईट वार्ता कथन करणारा होता.

शिकंदराच्या साहसानें पोरसाच्या पराक्रमावर मात केली !

पोरस सतलजच्या पुरावर भिस्त ठेवून तो कमी होण्याची वाट पहात बसला होता. तोंच शिकंदरानें राजधानीपासून चाळीस मैल वर असलेला एक उतार हुडकून काढला. एका रात्रीत त्यानें नावांच्या सहाय्यानें दहा-सहस्र करोल घोडेस्वार ऐलथडीस उतरविले, व त्यांच्या मागोमाग अग्नि-बाण फेंकणारी उल्हाटयंत्रेंहि आणविलीं. पोरस गाफीलच राहिला होता, तोंच अचानक त्याच्या उजव्या बाजूवर शिकंदराच्या सेनेचा जोरदार हल्ला झाला !

जमवाजमव करतांकरतां पोरसाची पुरेवाट झाली. शेवटीं तो स्वतः कवच लेऊन आणि शिरस्त्राण घालून सावित्रीदेवीच्या आशीर्वादासह रणां-गणांत उतरला. उजव्या बाजूची उडालेली दाणादाण सांवरण्याकरितां स्वतः पोरस हातीं दोदो तरवारी घेऊन रणांत झुंजूं लागला.

तोंच शिकंदराच्या दुसऱ्या एका तुकडीनें त्याच्या डाव्या बाजूवर मारा करावयास प्रारंभ केला, आणि पांच सहस्र स्वारांसमवेत स्वतः शिकंदर पोरसाच्या आघाडीवर तुटून पडला !

शिकंदरानें तिन्ही बाजूंनीं असा घाला घातलेला पाहून पोरस चव-ताळला. तो सिंहासारखा पराक्रमी वीर प्रत्येक आघाडीवर झुंज देऊं लागला. एकदां तो उजवीकडे धांव घेई. तर दुसऱ्या वेळीं त्याचा घोडा डाव्या बाजूस चमके. कांहीं क्षणांतच पोरस सामन्यावरही झुंजत असल्याचें दृश्य दिसे.

दोन्हीकडील वीर ऐन ईर्षेच्या भरांत झुजत होते. काय वाटेल तें झालें तरी यवन सेनेला भारताच्या अन्तर्मर्मात पाऊल टाकूं द्यायचें नाहीं, अशा निश्चयानें भारतीय वीर पराक्रमाची शर्थ करीत होते; तर कुठेंही फारसा विरोध न झाल्यामुळें किंचित् आळसावलेली ग्रीक सेना या प्रतिकारामुळें चिडीस पेटली होती. दुतर्फा अगदीं घेमार देमारीची झुंज पेटली होती. पडला, तो मातींत मिळाला, असें समजून त्याच्या छाताडावर पाय रोवून त्याचा शेजारी पुढें झेंप घेत होता.

एवढ्यांत पोरसाच्या आज्ञेवरून त्याची हत्तींची तुकडी बिनीवर चालून आली. पोरसाच्या थकत चाललेल्या सेनेनें आनंदानें गदारोळ केला! त्यांपैकीं एका उंच, धिप्पाड, पर्वतप्राय भासणाऱ्या हत्तीवरील अंबारींत स्वतः पोरस बसला, आणि माहुतांच्या अंकुश टोंचण्यानें चीत्कार करीत ते दा पाजलेले मस्त हत्ती शिकंदराच्या सेनेवर चालून गेले.

त्यांच्या सोंडांतून दुतर्फा धार असलेले पट्टे दिलेले होते. ते पट्टे हवेंत भिरभिरवीत जेव्हां ते हत्ती शिकंदराचें सैन्य अक्षरशः तुडवीत पुढें निघाले, तेव्हां कांहीं वेळपर्यंत लढाईचें पारडें पोरसाच्या बाजूनें फिरतेंसें वाटलें. पोरसाचे सैनिक आवेशानें या हत्तींच्या आश्रयानें नेटानें पुढें सरत शिकं-दरच्या सेनेला सतलजच्या पुरांत जलसमाधि देण्याकरितां तिच्यावर कोसळूं लागले.

तोंच शिकंदरच्या उल्हाटयंत्रांतून अग्निबाण सुटूं लागले, पारडें फिरलें!

अग्निबाणांचा मारा सुरू होतांच आतांपर्यंत शिकंदराची सेना पाय-दळीं तुडवीत असलेले ते मस्त मातंग उलटले, आणि अक्षरशः सैरावैरा धांवूं लागले! त्यांचा आश्रय घेऊन पुढें चालत असलेल्या सैनिकांचा त्या हत्तींनीं तुडवून चिखल केला! पोरसाचा पराभव अटळ झाला! आतां केवळ झुंजत मरणेंच काय तें शिल्लक राहिलें, आणि पोरसानें तोच निश्चय करून आपल्या

हत्तीच्या पायीं अंदू घालून त्याला ठिकाणावर जखडून टाकला ! आतां हें तोंड अपयश घेऊन सावित्रीदेवीला काय दाखवावें, अशा विचारानें त्यानें झुंजतां झुंजतांच देह धारातीर्थी ठेवण्याचें ठरविलें !

  

"झालें, आतां कांहीं शिल्लक उरलें नाहीं !

"भारतीय संस्कृतीचे पहारेकरी, या नात्याने करायचे तेवढें केलें ! पंजाबच्या सहस्र सहस्र तरुण वीरांच्या रक्तानें रणभूमि न्हाऊन निघाली आहे ! रणदेवता जर अजूनहि तृप्त झाली नसेल, तर तिच्या कुंडात शेवटची आहुति माझ्या भय्याची पडून तरी ती सन्तुष्ट होवो !

"माझा भय्या ! लाडका, पराक्रमी, निधडच्या छातीचा भय्या ! पण मला त्याचा मोह धरता उपयोगी नाहीं. हे जे सहस्रावधि तरुण धराशायी झाले, त्यांना बहिणी नव्हत्या का ? आपापल्या कुटुंबाच्या स्नेहाचें बंधन त्यांच्याही भोंवतीं असेल. पण तें बंधन तोडून ज्या अर्थी ते झुजले आणि धारातीर्थीं पडले... झाले, त्या अर्थी भय्यानेंही त्याच मार्गानें गेलें पाहिजे ! भय्या ! "

सावित्रीदेवी विव्हल होऊन विचार करीत होती. भावाची आठवण होऊन डोळयांत आलेलीं आसवें लपविण्याकरता ती दोन्ही हात तोंडावर झांकूं लागली, तोंच तिच्या हातातील अंगठीकडे तिचें लक्ष गेलें. ती अंगठी पहातांच जणूं बुडत्याला काडीचा आधार मिळावा, तशी एक कल्पना तिच्या मनांत चमकली. ती घाईघाईनें उठली, आणि तिनें लेखनसाहित्य घेऊन एक पत्र लिहिलें.

नंतर ती पळतच रणांगणाकडे निघाली.

ज्यांनीं ज्यांनीं तिला पाहिलें, त्यांनी त्यांनीं आश्चर्यानें तोंडात बोटें घातलीं. राजभगिनी अशा रीतीनें भर रस्त्यानें पळताना पाहण्याची त्यांना संवय नव्हती. आपापलीं बायकापोरें व घेववेल तितकें धन घेऊन पळून जात असलेले लोकही सावित्रीदेवीला एकटी पळतांना पाहून क्षणभर उभे राहिले.

पण सावित्रीदेवीला त्यांच्याकडे लक्ष देण्यास वेळ नव्हता. धावतच तिनें रणांगण गांठलें. तिथें शिकंदराची सेना पुढें झेपा घेत असलेली तिनें

पाहिली. एका ग्रीक सैनिकाच्या लक्षांत असें आलें कीं, सावित्रीदेवी आपणास बोलवीत आहे. जय तर मिळालाच होता. सावित्रीदेवीसारखी सुंदर स्त्रीही जर आपण होऊन गळयांत पडत असेल, तर कां नको म्हणा, असा पोक्त विचार करून तो यवन सैनिक लढणें थांबवून तिच्याजवळ गेला, आणि घोडयावरून खालीं उतरला.

"ही अंगठी घे, आणि हें पत्र या अंगठीच्या स्वामीला नेऊन दे!"

अंगठी पहातांच मात्र त्याचीं सुखस्वप्नें शरदभ्रांप्रमाणें ठिकाणावरच विरलीं. त्यानें सावित्रीदेवीला प्रणाम केला. जरी तिच्या बोलण्यातलें अवाक्षर त्याला उमगलें नाहीं, तरी त्याने ती अंगठी व पत्र घेतले, आणि तिथेंच थांबण्याचा इशारा करून घोडा भरधांव वेगानें पिटाळला.

कांही क्षणांतच सावित्रीदेवीनें असें पाहिलें कीं, कर्णे वाजूं लागले आहेत आणि यवनसैनिक युद्ध थांबवीत आहेत!

  

सर्वांगावर जखमा झालेला पोरस अजूनही छाती वर करून उभा होता.

त्याच्या समोर होता जगज्जेता शिकंदर, मुख शिरस्त्राणानें झांकलेला.

"मित्रा! तुझें साहस पाहून मी संतुष्ट झालों आहें! माझी युद्धाची भूक आज अनेक दिवसानंतर तुझ्या अंगणात शांत झाली! आता याबद्दल तुला मी काय देऊ? कसा वागवू?" शिकंदर प्रसन्न मुद्रेनें म्हणाला.

क्षणभर पोरसानें आपला खालचा ओंठ चावला, आणि म्हणाला,

"राजासारखा वागव! माझ्या हातीं एक खड्ग दे, एक तूं घे! आपण दोघें सारख्या योग्यतेचे आहोत. इथे द्वन्द्व खेळू! जर मी मेलों, तर माझें प्रेत पाय धरून ओढीत सतलजच्या पाण्यांत फेंकून दे! आणि तूं मेलास तर--"

"थांब! आतां युद्धाचीं बोलणीं बोलूं नकोस. जर मीं तुझें राज्य परत दिलें तर?"

"मी घेणार नाहीं!"

"कां?"

" क्षत्रिय, शत्रूंनीं दिलेलें दान स्वीकारीत नसतात !"

" आणि तुला मोकळें सोडलें तर ? "

" तर ? तर मी इथून दुसऱ्या देशांत जाईन. तिथें सैन्य उभें करीन आणि त्याच्या सहाय्यानें तुझ्यावर स्वारी करून माझें राज्य जिंकून घेईन ! "

शिकंदर प्रसन्न होऊन मोठमोठ्यानें हंसला. त्यानें आपणामागें उभ्या असलेल्या आंभीकडे सहेतुकपणें पाहिलें. आम्भीनें लाजेनें मान खालीं घातली.

शिकंदर पुढें होऊन म्हणाला,

"पण तुझी मनोकामना पूर्ण होणार नाहीं. हें राज्य माझ्या मनांतून तुला परत करायचें आहे. "

" कां ? "

"कारण तूं माझा भाऊ आहेस. शत्रू म्हणून नव्हे, पण भाऊ म्हणून दिलेली ही भेट तूं निश्चितच स्वीकारशील ! "

" भाऊ? " आश्चर्यानें पौरस म्हणाला.

"होय, तिकडे बघ. तुझी आणि माझी बहीण येत आहे ! "

पौरसानें पाहिलें कीं, खरोखरीच ग्रीक सरदारांनीं वेष्टिलेली सावित्री-देवी गंभीर मुद्रेनें इकडे येत आहे ! ती जवळ येतांक्षणींच पुढें होऊन तिला नमस्कार करीत शिकंदर म्हणाला,

"ये माई ! तूं अगदीं वेळेवर आठवण दिलीस ! त्या दिवशींही मी तुझ्याशीं खोटेंच बोललों. मीं माझी संपूर्ण ओळख तुला दिली नाहीं. "

शिकंदरानें आपल्या मुखावरील शिरस्त्राण बाजूला काढलें. त्याच्याकडे पाहून सावित्रीदेवी आश्चर्यानें म्हणाली,

" माझा राखीबंद भय्या ! "

"होय माई ! त्या दिवशीं पावसाच्या धारांना साक्षी ठेवून ज्यानें तुझी राखी हातांत बांधली, तोच मी, शिकंदर ! आतां त्या दिवशीं केलेल्या चुकीचें प्रायश्चित्त, म्हणून या माझ्या सिंहासारख्या पराक्रमी भावाला त्याचें राज्य तर मी परत करीत आहेच, पण सतलजच्या पलीकडील सिंधुदरिया-

पर्यंतचा मुलूखही त्याला देत आहें ! मात्र ऐकलेंस काय भय्या, पुनः कुठें लढाई करायचा प्रसंग आला, –आणि तो यावाच ! क्षत्रियाला युद्धाहून प्रिय-कर वस्तु दुसरी कोणती ? –तर अग्निबाणांच्या तोंडीं तुझे हत्ती उभे करीत जाऊं नकोस ! केवढा प्रचण्ड प्राणी ! मला एकदां तुझ्या हत्तीवर बसायचें आहे रे ! ”

पौरस आणि सावित्रीदेवी, दोघांनाही काय बोलावें, तें क्षणभर उमगलें नाहीं.

---

# चित्तौडची राखी —

एक ओसाड शिवालय !

त्याच्या शेजारी एक जुना गलितकाय विशाल वटवृक्ष !

बाकी मग भोंवतीं रान माजलेलें. पाडलेले महाल, उध्वस्त बाजार, फोडलेल्या विहिरी, नष्ट केलेल्या उद्यानांचे अवशेष, भ्रष्ट करून भंगविलेलीं देवालयें, सगळें भकास, उदासवाणें !

वद्य अष्टमी; सूर्यास्त होऊन गेलेला. प्रकाशाचें ज्यांना वावडें, अशा निशाचरांचे व्यवहार सुरू झालेले. वटवाघुळें कचकच करीत असलेलीं. रातकिडे परस्परांशीं स्पर्धा करीत कर्कश ध्वनि उमटवीत असलेले.

एक बैरागी मंद पावलें टाकीत त्या शिवालयांत शिरला. त्याच्या हातीं होता एक दीप. तो दीप त्यानें महादेवाच्या पिंडीसमोर ठेवला. महा— देवास नमस्कार करून तो बैरागी मांडी घालून महादेवापुढें बसला आणि रडूं लागला.

बराच वेळ त्याचें क्रंदन चालूं होतें.

तोंच एक प्रवासी देवळांत शिरला. तो दिवसभर खिन्न मनानें ते भग्नावशेष पहात होता. रात्रीं अंग टाकण्याकरितां म्हणून तो त्या मंदि- राच्या आसऱ्याला आला. रुदनध्वनि ऐकून तो क्षणभर चमकला. पण त्याच्या साहसी स्वभावामुळें तो तिथेंच उभा राहिला, आणि म्हणाला,

" कोण ?"

रडणारा थांबला. पुनः प्रवाश्यानें विचारलें,

"कोण रडतंय ? भ्यायचें कांहीं कारण नाहीं. माझ्या कमरेस शस्त्र असलें, तरी मजकडून विनाकारण अपाय व्हायचा नाहीं."

बैरागी म्हणाला,

"मला भ्यायचें कांही कारण उरलें नाहीं. आतां या जगांत माझें झालें आहे, त्याहून अधिक अहित करणारा कोणी मनुष्य अस्तित्वांत नाहीं. विचारणाऱ्याची योग्यता कळली, म्हणजे त्याप्रमाणें उत्तर देतां येईल."

"जर तो सामान्य मनुष्य असला तर ?"

"तर रडणारा सांगेल कीं, त्याची लंगोटी हरवल्यामुळें तो रडत आहे."

"आणि चितोडची ही दुर्दशा पाहून रक्ताचीं आंसवें गाळणारा पृच्छक भेटला तर ?"

"काय ?" बैरागी उठून म्हणाला, "मी जागा असून एका माणसाचें यथार्थ वर्णन ऐकत आहें ?"

"हांय !" उदास स्वरांत प्रवासी उद्गारला, "आज दिवसभर या ध्वस्त रणभूमीचें दर्शन घेत हिंडत आहें ! हें असें कां झालें, तें जाणून घ्यायची तीव्रतम इच्छा माझ्या मनीं उपजली आहे."

"जर हृदय पिळवटून टाकणारा तो इतिहास ऐकायला मिळाला, तर पृच्छक काय करील ?"

"ज्या कुणी या पवित्र भूमीचें असें स्मशान केलें, त्याची पाळेंमुळें खणून काढण्याकरितां जेवढे मानवी प्रयत्न आहेत, तेवढे सर्व करील !"

"तर मग मित्रा, ये ! एक दुर्दैवी रजपूत तुझें स्वागत करीत आहे ! इथें उपस्थित नसल्यानें जो त्या अपूर्व यज्ञांत आपली आहुति देऊं शकला नाहीं, असा एक हतभाग्य रजपूत इथें घडलेलें तें अत्यद्भुत पर्व तुला सांगेल ! बस या देवासमोर."

प्रवासी देवासमोर बसला. बैराग्यानें डोळ्यांतलीं टिपें पुसून टाकलीं, घसा साफ केला, आणि सांगायला प्रारंभ केला,

"दोन वर्षें झालीं.

"तेव्हां चितोड आजच्या स्वरूपांत नव्हता.

"प्रासाद नांदते होते. बाजार भरभराटींत होते. विहिरी तुडुंब भरल्या होत्या. उद्यानें पुष्पांनीं बहरलीं होतीं. मन्दिरें भक्तांच्या सुमधुर आलापांनीं निनादत होतीं.

"कारण त्या कालीं चितोडाधिपति रजपूत कुलभास्कर महाराणा सांगा इथें वास्तव्य करीत होता. शत्रूच्या स्त्रिया त्याचें नांव ऐकतां चळचळ कापूं लागत, आणि आपापल्या पतींना त्याच्याशीं शत्रुत्व करण्यापासून परावृत्त करण्याचा प्रयत्न करीत. दिल्लीपतीशीं त्यानें झुंज दिलें. गुजरातच्या सुलतानाला त्यानें आपल्या तुरुंगांत चणे खाऊं घालून ठेवलें होतें. या विदेशी आक्रमकांच्या उन्मत्त वेगाला त्यानें पायबंद घालून जखडून टाकलें होतें.

पण तो हिन्दुभाग्यरवि अस्तंगत झाला.

आणि मागें या चितोडला त्राता उरला नाहीं. त्याचा पुत्र विक्रमादित्य. त्याच्यापासून जवाहरबाईचे उदरीं जन्मला, म्हणून त्याला संग्रामसुत म्हणायचें. यापलीकडे त्याच्या गुणसमुदायांपैकीं एकाशींहि त्या विक्रमादित्याची ओळख होऊं पावली नाहीं ! नांव विक्रमादित्य, नुसतें नांव ! बिचाऱ्या त्या नांवालाहि लाज आली ! व्यसनी, स्त्रैण, उन्मत्त – पुरे ! त्याचें अधिक वर्णन करणें म्हणजे जिव्हा विटाळणें !

असा हा विक्रमादित्य राज्यावर बसला –होय ! त्यानें बसून राजगादी विटाळली ! यौवन, संपत्ति, प्रभुत्व आणि अविवेकीपणा, हे चारी दावेदार एकत्र आले ! पित्याच्या अमलांत त्यानें जोडलेले हिरे अन् माणकें – यानें त्यांना वाग्बाणांनीं वेध केला. सरदार रुसले, दरकदार रागावले ! मानकरी रुष्ट झाले ! व्रितकर्ते चिडले; शुभेच्छु संतापले ! विवेकी क्रुद्ध झाले !

हे सगळे सोडून गेले दरिद्री माणसाला यश सोडून जातें तसे.

आणि भोंवतालीं जमले लाळघोटे ! दुर्वर्तनी, दुर्व्यसनी, स्वार्थी, हीन मनोवृत्तीचे, हलक्या मनाचे, हलक्या कानाचे !

सगळा मेवाड संतापानें उत्तप्त झाला आणि राजमाता जवाहरबाईही !

संग्रामसिंहाची द्वितीय पत्नी, कर्मवती आपल्या महालांत रामायण वाचीत बसलेली. उदास जवाहरबाईनें आंत पाऊल टाकलें.

कर्मवती उठून उभी राहिली, आणि म्हणाली,

"राजमातेची मुद्रा आज अप्रसन्न कां ?"

"राजमाता! जिचा कुलकलंक पुत्र दुर्दैवानें आज गादीवर आहे, अशाची माता! बाई! माझ्या मनांतील वेदना तुम्हांला कळतील का?"

"शान्त व्हा जीजी! काय वाटेल तें झालें, तरी ती बाप्पा रावळची गादी आहे! आज ना उद्यां विक्रमादित्याला सुबुद्धि सुचेलच. तें मेवाडचें सिंहासन आहे! आज सहाशें वर्षें एकाहून एक सद्‌गुणी नृपतींनीं ज्यावर पाय ठेवला, तें आसन आपल्या स्वामीला दुर्गुणांच्या खाईंत कसें पडूं देईल?"

"कधीं उगवेल तो दिवस बाई?"

"मेवाडच्या गादीवर विश्वास ठेवा जीजी! एकतर मेवाडच्या सिंहासनावरील राजाच्या स्वभावांत परिवर्तन होईल, नाहीं तर–"

कर्मवती थांबली.

"कां थांबलांत बाई? नाहीतर काय तें स्पष्ट सांगून टाका! वाटेल तें अशुभ ऐकायला राजमाता सिद्ध आहे! मेवाडच्या राजसिंहासनाच्या पावित्र्यरक्षणाचे आड जवाहर आपला पुत्रमोह उभा राहूं देणार नाहीं!"

"कर्मवती – सतीसाध्वी कर्मवतीच्या डोळ्यांत एक अद्‌भुत तेज प्रकाशलें, आणि ती बोलली,

"नाहींतर मेवाडची राजगादी आत्मदहन करून घेईल!"

क्षणमात्र जवाहरबाई चमकली. दुसऱ्या क्षणीं आपणास सांवरून ती म्हणाली,

"बाई! तुमची ही वाणी खरी ठरो! मेवाडच्या कीर्तीला माझ्यामुळें कलंक लागायला नको आहे! हें आत्मदहनच जर मेवाडच्या शुद्धीसाठीं अधिक हितकर असेल, तर तेंच होवो!"

आणि तेंच व्हायची पाळी कल्पना करवणार नाहीं, इतक्या लवकर येऊन धडकली!

गुजरातचा सुलतान बहादुरशाह!

तो रात्रंदिवस सूडाच्या प्रखर अग्नींत जळत होता. महाराणा संग्रामसिंहानें त्याला खाऊं घातलेले चणे त्याच्या पोटांत अजूनहि डांचत होते.

त्यानें संग्रामसिंहाचा तारा अस्तंगत झाल्याची वार्ता ऐकली.

आणि आनंदानें उन्मत्त होऊन ही वार्ता सांगायला आलेल्या सैनिकाला त्यानें अरबस्थानांतून आणलेलें सुवर्णजडित शहामृगाचें अंडें, जें त्याला प्राणाहून प्रिय होतें—देऊन टाकलें! फकिरांना खैराती सुरू केल्या. ठिकठिकाणच्या मुर्शदांना सवा सवा मणाचे पुलाव तयार करून पाठविले. जागोजागच्या पिरांवर बहुमूल्य भरजरी गलेफ चढविले.

मग सुगंधी गुडाखूचा एक कश् खेंचीत मेंदी लावून तांबड्या केलेल्या आपल्या दाढीवर कौतुकानें हात फिरवीत तो म्हणाला,

"आतां चितोडहि न कुछ चीज! जर चितोडवर फडकत असलेला राजपुतांचा झंडा माझ्या घोड्याच्या जिनावर शिवून काढून तिथें मी माझा झंडा न फहराविला, तर माझें नांव बहादुरशाह उगीच ठेवलें!" त्यानें युद्धाची सिद्धता केली.

वाऱ्यावर वहात वहात ही वार्ता एक दिवस चितोडवर येऊन पोंचली.

विक्रमादित्यानें ती ऐकली आणि कान झाडून मोकळा झाला.

पण कर्मवती आणि जवाहरबाई, या दोघींनीं ती ऐकली, आणि त्यांचें अन्न तुटलें. मित्र दुरावलेले; हितचिंतक रुसून बसलेले. मेवाडचा दरबार तोंडपुजाऱ्यांनीं ठेंचून भरलेला!

तरी स्वस्थ बसून कसें भागेल?

झुंज खेळणें, मरणाची भेट होईपर्यंत झुजत राहणें, हा राजपुतांचा स्वभाव. त्या राजपुतांच्या कुळीं उपजलेल्या त्या दोघी—त्यांच्या प्रेरणेनें दरबार भरविला गेला. झाडून सगळ्या मानकरी—सरदारांना स्वतः राजमातेनें संदेश पाठविला. तिच्या शब्दाला मान देऊन दरबारांत जागा पुरेना, इतके सरदार मानकरी गोळा झाले.

बोलण्याचें काम होतें कर्मवतीकडे.

आपला बुरखा एकीकडे ठेवून ती राजपुतानी आपल्या लेंकराला हातीं घेऊन सर्वांच्या समोर उभी राहिली, आणि म्हणाली,

"बाप्पा रावळचे वंशज! मेवाडच्या मानाचे मानकरी! राजपुतानींचे पुत्र!

" आपणा सर्वांस माझा सवाल आहे.

" मेवाडच्या स्वातंत्र्याचा शत्रु आज मेवाडच्या स्वातंत्र्यचंद्राचा राहु बनू पहात आहे. त्याच्या सैन्यांतले हजार हजार घोडे लगामांनीं आवरले गेल्यामुळेंच काय ते टापांनीं जमीन उकरीत उभे आहेत. त्याचा संकेत व्हायचा अवकाश कीं, दुसऱ्या क्षणीं ते आकाश आच्छादून टाकणारी धूळ उडवीत मेवाडवर चालून येतील !

" अशा वेळी आपण काय करणार ? "

एक म्हातारा सामत उठला आणि बोलला,

" महाराणीजी, आम्ही पुष्कळ करूं. पण सिंहासनाला आमची आवश्यकता नाहीं ! "

सर्वांनीं विक्रमादित्याकडे पाहिलें. तो मान खालीं घालून स्वस्थ बसला. कर्मवती म्हणाली,

" सामंत ! कुणाचें सिंहासन ? कुणाच्या रक्ताचा समरभूमीला अभिषेक होऊन सिंहासनाची स्थापना झाली ? तुमच्याच नव्हे काय ? तुम्हा सर्वांच्या रक्ताचे खतपाणी खाऊन मेवाडचा हा राजवंश जोपासला गेला नाहीं काय ? "

" होय महाराणीजी ! पण– "

" आतां पण एकच ! बहादुरशाहच्या बहादुरीला प्रत्युत्तर देऊं, तरच आम्ही सुखानें भोजन करूं, अन्यथा नव्हे ! सामंत, हें तुम्हां सर्वांचें सिंहासन. याची प्रतिष्ठा राखण्याचा भार तुम्हा सर्वांकडे. तुम्ही जर आपलें हें कर्तव्य नाकारीत असाल, तर मग राजपुतानींना आपापल्या चिमण्या दूधपित्या बाळांचें सैन्य उभारावे लागेल ! त्याचें आधिपत्य राहील या माझ्या आठ वर्षांच्या लेंकराकडे ! बहादुरशहाशीं टक्कर देत असतां भूमीवर लोळण घेणारें पहिलें मस्तक असेल या माझ्या बाळाचें ! "

दरबार थरकला ! सहस्र सहस्र रोमांच उभे ठाकले. तलवारी सरासर म्यानांबाहेर लपकल्या. अवघ्यांच्या कण्ठांतून ध्वनि उठला,

" जय मेवाड ! जय बप्पा रावळ ! "

हर्षनिर्भर झालेली कर्मवती म्हणाली,

"तर मग आठ दिवसांचे आंत अवघ्यांच्या सेनांचे घोडे चितोडच्या माळावर चरले पाहिजेत !"

दरबार ओसरला. मेवाड चैतन्यानें जागा झाल्यासारखा हलू लागला.

पण कांहीं केलें तरी बहादूरशहाच्या सेनेशीं यशस्वीपणें झुंजेल, इतकें सैन्य जमतां दिसेना ! त्यांत या पाळीला बहादुरशाह फिरंग्यांचा तोफखाना सर्वे घेऊन येत असल्याची वार्ता कळली !

भाराक्रान्त कर्मदेवी ! रात्रंदिवस मेवाडच्या यशाच्या चिंतेनें क्षीण होत चाललेली. काय केलें, कुणाचें सहाय्य घेतलें, म्हणजे मेवाडची सौभाग्य-लक्ष्मी घरांत नांदेल ?

अचानक तिच्या मनांत एक कल्पना चमकली. त्वरित तिनें आपला दीर बाघसिंग यास आमंत्रिलें. तो येतांच ती त्यास म्हणाली,

"देवरजी ! एका बाबतींत सल्ला मागत्यें मी."

"सांगा भाबीजी."

"मी एका पुरुषाला राखी पाठविली तर ?"

"कोणाला ?"

"सांगत्यें. आज अनेक वर्षे तो या आमच्या देशांतलें अन्न खात आहे, इथल्या गंगा–यमुनांचें पाणी पिऊन तो हृष्टपुष्ट झाला आहे. रामाच्या देशांत, कृष्णाच्या देशांत, पांडवांच्या देशांत तो मनुष्य वास्तव्य करीत आहे. या महाभागांनीं ज्या देशांत आपलें तेजस्वी जीवन जगून संपविलें, तो देश त्या जीवनाचें अमृत पिऊन कोरडाच राहिला असेल काय ? गंगा–यमुनांचें पाणी त्यांच्या कांठीं तपश्चर्या करणाऱ्या ऋषिमुनींच्या सान्निध्यानें संस्कार-क्षम झालें नसेल काय ? या वातावरणांत राहून अजून त्या माणसावर आमच्या भारतीय संस्कृतीचा रंग चढला नसेल काय ?"

"अलबत चढला असेल ! इथें शक आले, हूण आले, जिंकण्याच्या इच्छेनें. पण इथल्या वातावरणाचा स्पर्श होतांक्षणींच ते आपली जेतृत्व-भावना विसरले, भारतीय म्हणण्यांत भूषण मानूं लागले ! तुमचा तो माणूस–मग तो कोणी का असेना, त्याच्यावर इथल्या या चैतन्याचा रंग उमटल्या-शिवाय राहिला नसेल !"

" तर मग देवरजी, मी हुमायूनला राखी पाठवूं म्हणत्यें."

आश्चर्याचा धक्का बसून बाघसिंगाच्या हातची करवाल गळून पडली. ती सांवरून तो म्हणाला,

" हुमायून ! महाराणा सांगाचा शत्रु ?"

" होय ! आमच्या ऋषीमुनींच्या तपश्चर्यांची ही परीक्षा आहे ! त्यांनीं तपश्चर्या केलेल्या देशांतलें अन्न खाणारा माणूस आपलें स्वत्व विसरून इथल्या संस्कारांशीं समरस होऊं शकतो कीं नाहीं, हेंच मला बघायचें आहे. मला ठाऊक आहे, कीं हें साहस आहे. यशस्वी झालें —"

" तर ठीकच आहे. पण अयशस्वी झालें तर ?"

" तर ? आमचें सैन्य कांहीं लुटुपुटीच्या तरवारी त्यालें नाहीं ! आणि महासती पद्मिनीनें घालून दिलेला आदर्श जोंपर्यंत आमच्या स्मरणांतून गेला नाहीं, तोंपर्यंत कशाची चिंता ?"

दुसरे दिवशीं एक दूत एका सांडणीवर बसून दुडकी गतीनें बिहारच्या मैदानाकडे निघाला. हुमायून शेरशहाशीं लढती ळम्बेत होता. त्याचा पडाव गंगेच्या तटाकीं मोंघीरजवळ पडला होता. त्याच्या हातीं जासुदानें राणी कर्मवतीचा खलिता व राखी दिली, आणि वाटेंत झालेल्या श्रमांनीं सांडणीनें प्राण सोडला !

गंगेच्या तटाकावरील आपल्या शामियान्यांत बसलेल्या हुमायुनानें सरंदिशीं खलित्याच्या थैलीचे बंद सरकावले, आणि आंतील पत्र तो वाचूं लागला.

" माझे राखीबंद भाई ! उदयसिंहाचे मामा !

" राखीनें आपणाशीं भाऊपण जोडणाऱ्या आपल्या बहिणीचे आपणास नमस्कार !

" आपण ज्या ब्रह्मावर्तांत राहतां, त्याचें मी आपणास स्मरण देतें. आपण ज्या हस्तिनापुरी—दिल्लीला राहतां, तिथें नांदलेल्या पांडवांचें आपणास स्मरण देतें. आपण ज्या गंगा—यमुनांचें पाणी पितां त्याचें आपणास स्मरण देतें.

" आपणाभोंवतीं वाहणारा वारा हिमालयावरून, ऋषींच्या तपश्चर्यास्थलावरून आपणाकडे वहात आला आहे, त्याचें मी आपणास स्मरण देतें.

" आपण ज्या भूमींतलें अन्न खातां, त्या भूमींत अत्यंत श्रेष्ठचरित असे आर्य रहात असत. त्यांचें मी आपणास स्मरण देतें.

" हें सगळें मिळून भारताचें वातावरण रंगून निघालें आहे. त्या वातावरणांत रहाणारे आपण,

" जर या वातावरणाचा आपणावर परिणाम झाला असेल,

" जर आपलें मन इथले संस्कार उमटू शकण्याएवढें संस्कारशील झालें असेल,

" जर आपण आपल्या बहिणीच्या संकटांत धांवून जाण्याचा धर्म पाळूं इच्छीत असाल,

" तर –

" तर मी आपणास या वेळीं आवाहन करीत आहें.

" बहादुरशाहरूपी नक्र चितोडचें स्वातंत्र्यमाणिक गिळूं पहात आहे.

" त्याच्या हातून त्या माणिकाची मुक्तता करून तें माणिक आपल्या या बहिणीच्या आरतींत ओवाळणी म्हणून घालाल काय ?

" आपल्या पत्रोत्तराची वाट पहात आहें."

हुमायूननें पत्र वाचलें. क्षणभर तो त्या राजपुतानीचें तें साहस पाहून थक्क झाला !

पण लगेच त्याची दृष्टि समोरील गंगेच्या पाण्यावर गेली. त्याला पत्ररूपी पटाचा एकेक धागा स्पष्ट दिसूं लागला.

" आपण ज्या गंगायमुनांचें पाणी पितां–"

उत्तरेकडील वाऱ्याच्या झुळकीनें शामियान्याचा पडदा हलला.

" आपणाभोंवतीं वहाणारा वारा–"

त्याचें लक्ष गंगेच्या कांठीं शांतपणें डोलणाऱ्या गव्हाच्या लोंब्यांवर गेलें.

" आपण ज्या भूमींतलें अन्न खातां–"

" जर या वातावरणाचा–"

" जर आपलें मन–"

" – धर्म पाळूं इच्छीत असाल –"

त्वरित हुमायून उठला. त्याच्या यावनी शरिरांतलें भारतीय रक्त जागें झालें. त्याने लेखनसाहित्य मागविलें, आणि पत्र लिहिलें.

" मत्प्रिय भगिनीस सादर नमस्कार.

" निमंत्रणाप्रमाणें येत आहें."

दुसऱ्या साडणीवर बसून जासूद चितोडकडे रवाना झाला. हुमायूननें आलेले डेरे हलविले.

पण बहादुरशाहला हुमायून चितोडच्या मदतीला येईपर्यंत वेळ नव्हता. चितोडभोंवती वेढा पडला. फिरंगी गोलंदाजाच्या तोफांचे मोर्चे लागले. रण-धुमाळी सुरू झाली.

अचानक एक वृद्ध दास कर्मवतीच्या महालांत धांवत आला आणि प्रणाम करून म्हणाला,

" महाराणीजी ! विक्रमादित्य, महाराणाजी– "

" काय झालें ? " शेजारीच बसलेल्या जवाहरबाईनें विचारलें.

" काल रात्रीं चितोड सोडून निघून गेले ! त्यांच्या बरोबर गेलेला दून आज त्यांचा संदेश घेऊन आला आहे ! तो म्हणतो, लढण्याचा कंटाळले म्हणून– "

जवाहरबाईचं तोंड काळें ठिक्कर पडलें. कर्मवती म्हणाली,

" जीजी ! चिंता करूं नका ! मेवाडची गादी रिकामी राहू शकत नाहीं. केसरिया बाणा पेहरण्याचा वक्त आहे. जो, तो बाणा पेहेरण्यास सिद्ध असेल, तो– "

तोंच बाघसिंगानें केशरिया वस्त्रें घालून आंत प्रवेश केला. त्याला पाहून कर्मवती प्रणाम करीत म्हणाली,

" मेवाडाधिपति चितोडाधीश बाघसिंग ! आपणाला आपल्या पहिल्या प्रजाजनाचा प्रणिपात ! " गद्गद होऊन बाघसिंग म्हणाला,

" भाबीजी ! रजपूत कशालाहि मागें सरत नसतो. आपल्या आज्ञे-बाहेर मी नाहीं. आतां दुसरी आज्ञा काय आहे ? "

" हुमायूनकडलें उत्तर अनुकूल आलें आहे. पण त्याची वाट पहात बसावयाचें नाहीं ! झुंजायला प्रारंभ होऊं द्या ! "

दुसरे दिवशीं बहादुरशाहचा तोफखाना आग ओकूं लागला.

हुमायून चंबळच्या तटाकीं येऊन पोंचला, तों त्याला बहादुरशाहचें पत्र मिळालें.

" नेक आदमी आपल्या इमानाशीं एकनिष्ठ रहात असतो.

" कर्मवतीनें टाकलेल्या जाळ्यांत सांपडण्याइतके दिल्लीपति कधीं-पासून कमजोर झाले ?

" एकाच इमानाचे दोन वाघ आपसांत झुंजविण्याकरितां तिनें मांड-लेला कावा आपल्या लक्षांत कसा आला नाहीं ?

" आशा आहे कीं, हिंदुस्थान जिंकणाऱ्या बाबराचे पुत्र एवढ्यानं जागे होतील ! "

हुमायूनच्या मनाच्या कमजोर ठिकाणीं बहादुरशाहनें घाव घातला. तो चंबळवरच रेंगाळला. जावें कीं न जावें ? त्याच्या मनाचा निश्चय होईना !

आणि तोंपर्यंत ?

तोंपर्यंत फिरंग्यांच्या तोफांच्या भडिमारानें चितोडच्या तटास भगदाड पडलें ! पुत्राच्या पलायनानें विद्ध झालेली जवाहर तें भगदाड लढवतां लढ-वतां धारातीर्थीं पडली !

प्रतिदिनीं अटीतटीचा सामना सुरू आहे. निकराचें झुंज खेळून रजपूत सेना हंसत हंसत स्वर्गाकडे गमन करीत आहे. आज हा गेला, उद्यां तो. कुणाच्याहि मुखावर खेदाचा लवलेश नाहीं. मेवाडच्या प्रतिष्ठेकरितां, मेवाडच्या गौरवाकरितां प्रत्येक जण मरण स्पष्ट दिसत असतांहि त्याला कवटाळीत आहे.

राजवाड्याच्या सौधावर उभी राहून कर्मवती हुमायूनच्या वाटेकडे डोळे लावून उभी आहे. कुठें धुळीचा लोट दिसेल. कुठें निशाणें दिसतील. माझा भाऊ धांवत येईल.

पण हुमायून आला नाहीं ! बहादुरशहानें मांडलेल्या जाळयांतच तो अडकून राहिला !

गडावर मूठभर रजपूत राहिले. बाघसिंग, रक्तानें शरीर माखलेला महाराणा बाघसिंग कर्मवतीच्या महालांत आला. राणी सौधावर उभी राहून भावाला मनोमनीं साद घालीत होती,

"भाऊराया ! धीर सुटत चालला ! आतां तरी येरे ! "

पण हुमायून आला नाहीं !

त्याऐवजीं बाघसिंगाची साद ऐकूं आली. राणी खालीं उतरली. बाघसिंगाला म्हणाली,

"काय आज्ञा आहे ?"

"घटका भरत आली !"

"आम्ही सिद्ध आहोंत !"

वाद्यें वाजूं लागलीं. सनया बोलूं लागल्या. बहादुरशाह विचार करतो, युद्ध चालू असतां कुणाचें लग्न मांडलें ? बिचारा बहादुरशाह ! त्याला जर कळतें कीं, रजपूत कसल्या मातींतून जन्माला आले आहेत !

सतीच्या गुहेचीं दारें उघडलीं ! जोहाराच्या गुहेचे पट उघडले. आंत चन्दनाचीं, आंबा, चिंच, बाभूळ जीं सांपडलीं तीं लांकडें भरलीं गेलीं. वर ज्वालाग्राहि पदार्थांचा थर. क्षणांत भडका उडेल असा ! निरोप गेला.

मंगलगीतें गात स्त्रियांचा थवा निघाला. कुठें ? त्यांना कुठेंची काय चिंता ? राजपुतानींना विवाह आणि जाळून घेणें, दोन्ही सारखीं. एकीच्याहि मुखावर खेदाची छटा नव्हती. हर्ष ! उन्माद ! आनंद ! संतोष ! सगळ्या वयांच्या, बाला, तरुणी, वृद्धा! संसार उरकलेल्या, त्याच्या मध्यभागीं विहार करीत असलेल्या, त्याची ओळखहि न झालेल्या ! अनेक आशा अनेकींच्या अनेक आकांक्षा पण हें सगळें झुगारून दिलें, चिलमींतली राख निष्काळजीपणें फेंकावी तसें !

आणि त्या प्रसन्न शतशत युवती त्या गुहेंत शिरल्या. चितेवर जाऊन बसल्या. नीट मांडी घालून जणूं सारीपाट खेळायला बसल्या आहेत. शेवटीं शिरली कर्मवती. तिच्या हातीं होता पेटता काकडा. चितेवर पाऊल ठेवतांच तिनें तो चितेला लावला—

भडका ! प्रळय ! अंगार ! जोहार !

सगळे राजपूत केसरिया बाणा पेहरून शस्त्रें पेलीत किल्ल्याची दारें सताड उघडून शत्रूवर कोसळले. त्यांनीं आपलें सोनें करून घेतलें.

विजयी बहादुरशाह चितौडमध्यें शिरला. त्याच्या स्वागताला एक खरजुलें कुत्रें वर उभें होतें ! सतापून त्यानें चितौडची ही दुर्दशा केली !

हुमायून झोंपला होता. त्याला झोंपेंत एक स्त्री दिसली. ती म्हणाली

" आला नाहीस ना ? "

तो दचकून उठला. पश्चात्तप्त हुमायून धुळीचा लोट उधळीत ससैन्य चितौडकडे आला. बहादुरशाह ही वार्ता ऐकताच पळपुट्या श्वानासारखा पळून गेला. हुमायून गडावर आला. त्याने तिथें उशीरां येऊन पोंचलेल्या एका रजपुताला कर्मवतीचा पत्ता विचारला. त्या रजपुताने रडत चितेच्या राखेकडे बोट दाखविलें.

खिन्न हुमायून चितेजवळ गेला. चिमूटभर राख उचलून त्यानें कपाळास फांसली, आणि म्हणाला,

" भगिनी ! जात्यभिमानाला बळी पडलेल्या या तुझ्या भावाला क्षमा कर ! मला माहीत आहे, तूं क्षमा करशील ! "

ज्या वेळीं हुमायून गड उतरून गेला, त्या वेळीं त्याचे डोळे पाणी गाळत होते !

बैरागी थांबला. प्रवासी उठला. त्यानें एक दीर्घ श्वास सोडला आणि पुटपुटला,

" धन्य चितौड ! धन्य कर्मवती ! चितौडच्या वैभवाचे पुनरुत्थान हा माझ्या भावी जीवनाचा मंत्र ! "

बाहेर ओरडणाऱ्या एका पक्षानें त्याच्या पुटपुटण्याला साथ दिली.

---

# साखीबन्द भाई —

नगाऱ्यावर टिपरू पडलें.

आणि बैलांच्या चार जोडया प्राणपणानें पळूं लागल्या.

दोन दोन महिन्यांपासून त्या बैलाना ठाणावर बांधून चंदीचारा सु होता. शेजारचीं गुरें त्यांच्या खाण्याकडे लोभावलेल्या नजरेने बघत. रानांतलें उभें कोंवळं लुसलुशीत पीक कापून त्या बैलाना खाऊ घातले जात होतें. त्यांच्या अंगावर मांस मावत नव्हतें.

आणि त्यांत आज त्यांना कुसुंबा पाजून धुंद केलें होतें. पायण्या धडपणें उचलतां येत नसलेले ते बैल वेसणीना कासऱ्याची ओढ लागली असल्यामुळेंच काय ते ठीकच्या ठिकाणीं जमीन खुंदळीत उभे होते.

त्या बैलांचे कासरे हातीं असलेले राजपूत जवान आपापल्या छकडयांत ऐन अवसान साधून बसले होते. त्यांच्या हातीं बोटबोट टोंकदार खिळे असलेल्या पराण्या होत्या. ते नगाऱ्याचा ध्वनि अंतराळांत घुमायचीच वाट पहात होते. तो ध्वनि होतांक्षणींच त्यांनीं कासरे ढिले सोडले, आणि त्यांच्या हातांतील पराण्या बैलांच्या पुठ्ठयांत बोट बोट जाऊन रुपल्या. त्या बाहेर निघतांच पुठ्ठयांतून रक्ताचीं कारंजीं उडूं लागलीं, आणि बैल मुसाट पळत सुटले.

गंगामाईच्या विस्तीर्ण तटाकावरील ती शर्यत पाहण्यास सहस्रावधि उत्सुक नरनारींचे नेत्र आकुळले होते. अगोदरच गणगौरीची यात्रा, हें

राजपुतांच्या जीवनयात्रेंतील एक अत्यंत महत्त्वाचें अंग. त्यांत राजपुतान्यापासून सुदूर, बिहार प्रांतांतील अगंळ संस्थानांत निमित्तवशात् कांहीं राजपूत कुटुंबांना जाऊन रहावें लागलें असल्यामुळें आपल्या जीवनांतील हीं उत्सवपर्वें मोठ्या कसोशीनें सांभाळणें ते राजपूत आपलें कर्तव्य मानीत असत.

अर्थातच स्थलान्तराबरोबर या उत्सवांत तद्देशीय अशा कांहीं नवीन रूढींचा प्रवेश होणें कांहीं अशक्य नव्हतें. वरील बैलगाड्यांची शर्यत हा या नवीन रूढींपैकींच एक भाग होता. राजपुतांच्या अंगीं असणाऱ्या क्षात्रवृत्तीचेंच तें निदर्शन असे. या शर्यतींतील बैल किंवा गाडीवान् यांचीं जीवितें ही शर्यत पार पाडून परत जशींच्या तशीं हातीं लागतीलच, असें कोणी सांगूं शकत नव्हता. पण या शर्यतीनंतर ती जिंकल्याबद्दल अर्गळच्या महाराणींकडून त्या विजेत्या राजपुतास आणि त्याच्या बैलास जें बक्षीस मिळत असे, त्यासाठीं एवढें हें मूल्य म्हणजे कांहीं मोठीशी गोष्ट नव्हती.

स्वतः महाराणींनीं करस्पर्श केलेली तरवार, आणि त्या बैलांकरितां जरीचें काम केलेल्या मूल्यवान् झुली, हें होतें ती शर्यत जिंकणाऱ्या त्रयीचें बक्षीस.

हें बक्षीस मिळविण्याकरितां उपरिवर्णित चार जोड्या प्राण पणास लावून पळत होत्या. त्यांचे कासरे हातीं घेऊन छकड्यांत असणारे त्यांचे धनी–आकांक्षा अनावर होऊन त्यांचीं तोंडें लालबुंद झालीं होतीं–बैलांच्या मागून अंधळत उडणाऱ्या धुळींत भर टाकणाऱ्या छकड्यांत बसले होते कीं उभे होते, हें नक्की सांगणें मोठें कठीण होतें. ती शर्यत पाहणारा सहस्रावधि स्त्रीपुरुषांचा समूह त्यांच्या नजरेसमोर नाहींसा झाला होता. त्यांना दिसत होती केवळ शर्यतीची सीमारेषा ! हातांतील पराण्या बैलांच्या पृष्ठभागांत वारंवार खुपसीत आणि त्यांना प्रोत्साहनपर हुंकार भरीत ते त्या रेषेवर दृष्टि लावून होते.

नानाप्रकारचीं वस्त्रें ल्यालेल्या व आभूषणांनीं सजलेल्या त्या समूहाच्या मध्यभागीं मुद्दाम तयार केलेल्या उच्चासनाचा अर्धा भाग जाळीदार

चिकाच्या पडद्यानें आवृत होता. अर्ध्या उघडया भागावरील आसनावर सकौतुक नेत्रांनीं ती शर्यंत बघत महाराणा गौतमसिंग बसले होते. पडद्या-मागें महाराणी जानकीदेवी बसल्या होत्या. हुरहुरत्या अंतःकरणानें त्या ती शर्यत पहात होत्या.

महाराणी जानकीदेवींचें वय जरी तारुण्याची सीमा वलांघून प्रौढ-त्वाच्या क्षेत्रांत पाऊल टाकूं लागलें नव्हतें, तरी त्यांच्या मुद्रेवरील वात्सल्य-भाव मात्र उपेक्षणीय नव्हता. त्यांची मूळची तेजस्वी सुंदर मुद्रा आपल्या प्रिय प्रजाजनांच्या त्या साहसानें किंचित् काळवंडून गेली होती. या साहसाचा शेवट आपल्या कुण्या प्रजाजनाच्या मृत्यूनें तर होणार नाहीं ना, अशी शंका त्यांच्या मनीं नांदत होती.

जमलेल्या प्रचण्ड समूहाच्या कल्पनांना धक्के देत बैलांच्या जोडया सुसाट पळत होत्या. होतां होतां त्या चार जोडयांपैकीं दोन जोडया मागें टाकून दुसऱ्या दोन पुढें निघाल्या. समूहाच्या डोळयांनींहि तसेंच केलें. त्या दोन्ही जोडया परस्परांना अगदीं खेटून धांवूं लागल्या.

त्यांपैकीं एका जोडीचीं शिंगें मोठीं डौलदार, उभट आणि तीक्ष्ण अग्रांचीं होतीं. त्यांच्या टोंकांस चांदीच्या शाम्या बसवल्या असून त्या शाम्यांना छोटीं छोटीं घुंगरें लटकत होतीं. त्यांच्या डौलांत ती जोडी भरा-भर अंतर मागें टाकीत होती.

दुसऱ्या जोडीचीं शिंगें तर तितकीशीं प्रेक्षणीय नव्हतीं, पण त्यांची उणीव त्यांच्या गळयांतील घुंगुरमाळांनीं भरून काढली होती. कांशाचीं तीं घुंगरें कारागीरानें अशीं कांहीं खुबीदार ओतलीं होतीं कीं, त्यांतून साती स्वर एकदम निघून मजेदार ध्वनि निर्माण होत असे. साती स्वर घुमवीत ते बैलहि शेपटया उभावून हरणांसारख्या उडया फेंकीत होते.

लोकांचा उत्साह अनावर झाला. कोणी ओरडूं लागले; कोणी शिटया फुंकल्या. कोणी दुपट्टे वर फेंकून आभाळ झांकाळून टाकलें. कोणी काठया वर उचलूं लागले. कोणी तरवारी आकाशांत परजूं लागले. कोणी भाले पेलूं लागले. म्हातारे आपलें म्हातारपण विसरून पोरांसारखे उडया मारूं लागले. सगळयांनीं मिळून गदारोळच केला.

दोन्ही जोडया अगदीं परस्परांशीं भिडून धांवूं लागल्या.

डौलदार शिंगांच्या धन्यानें कुसुंब्याचें थोडें अधिक सेवन केलें असल्यानें दोन्ही जोडयांच्या बरोबरीनें धांवणें त्याला सहन झालें नाहीं. त्यानें पराणी फेंकून दिली, आणि छकडयांतून विटा उपसून बाहेर काढला. तो त्यानें उंच पेलला, आणि त्याचें टोंकदार पातें एका बैलाच्या पाठींत खुपसलें! त्या वेदना असह्य होऊन पळतां पळतांच बैल खालीं वांकला, आणि दुसऱ्या क्षणीं जेव्हां तो वर उठला—

तेव्हां त्याचें शिंग शेजारून धांवणाऱ्या बैलाच्या घुंगुरमाळेंत अडकलें होतें!

महाराणींच्या तोंडून एक भयदर्शक चीत्कार बाहेर पडला. सगळ्या समूहाच्या आनंदाची जागा विस्मयानें घेतली. विव्हल नजरेनें तें दृश्य पहात असतां लोकांच्या कानीं महाराणींचे शब्द पडले,

"थांबवा! शर्यत थांबवा!"

ते शब्द ऐकतांच लोकहि गर्जूं लागले,

"थांबवा! शर्यत थांबवा!"

कांहीं तगडे जवान त्या बैलांना धरण्यासाठीं मैदानांत पुढें घुसले. या गलबल्यानें ते बैल अनावर झाले, गोंधळून जाऊन त्यांनीं केवळ पळणें सुरू ठेवलें, केवळ पळणें! तोंपर्यंत तें डौलदार शिंग घुंगुरवाल्या बैलाच्या खांद्यांत रुपून तिथून रक्ताची चिळकांडी बाहेर फुटली होती!

नेमक्या याच क्षणीं लोकांना दुसरा एक आरडा ऐकूं आला,

"मारा! ठोका! एकालाहि पळून जाऊं देऊं नका!"

निःसंशय या मजेपेक्षां हा नवीन ओरडा अधिक आकर्षक होता. मारा-मर्यें, हें अगदीं मान्य. राजपुतांच्या लढाऊ बाण्याला तें अगदीं उचित वाङ्मय होतें. "मारा! ठोका!" वा! काय सुंदर आदेश आहे! सगळ्यांनीं त्या बैलांना तसेंच सोडून आपापलीं शस्त्रें सावरलीं.

पण कुणाला मारायचें? कुणाला ठोकायचें?

सगळे राजपूत गोंधळांत पडले. त्यांचे फुरफुरणारे हात आपल्यांजागीं थंडावले.

तोंच त्यांनीं असें पाहिलें कीं, दोनअडीचशें लोकांचा एक क्षुब्ध समूह मध्यभागीं कांहीं इसमांना घेऊन महाराणाजींच्या आसनाकडे पुराच्या लोंढ्यासारखा पुढें सरकत आहे. मग शस्त्रें उपसून सगळे तिकडे धांवले.

ती लाट आसनाजवळ येतांच महाराणाजींनीं हात वर उचलला. तो पहातांच सगळा समूह ठिकच्या ठिकाणीं थांबला, आणि कांहीं सशस्त्र, डोळे वटारून भोंवतालीं पहात असलेले, रक्ताळलेले यवन सैनिक महाराणाजींच्या पुढें उभे केले गेले.

" काय आहे ?" महाराणाजींनीं विचारलें.

" महारावळजी !" एक म्हातारा राजपूत वंदन करून म्हणाला, " आपल्या लेकीबाळी डोईवर कलशांच्या उतरंडी घेऊन यात्रेकडे येत होत्या. या दरोडेखोरानीं भाल्याच्या टोकांनीं ते कलश पाडून टाकले, आणि त्या लेकीबाळींची अमर्यादा केली ! हे दरोडेखोर — "

" चूप ! मग्रूर कहींका ! कोण दरोडेखोर ?" त्या यवनांतला सर्वांत अधिक व्यवस्थित पोशाख केलेला गर्जला.

" थांबा !" परत महाराणाजींचा हात वर आला. ते पुढें म्हणाले, " तुम्ही कोण अहांत ?"

" आम्ही ?" तो यवन सरदार गुरगुरला, " आम्ही दिल्लीच्या पातशाहतीचे दूत आहोंत ! तुमच्याकडे चार वर्षें राहिलेली खंडणी वसूल करण्यास वजीर–ए–आजमनीं धाडलं आहे आम्हांला. हा त्यांचा खलोटा !"

त्या सरदारानें कमरपट्ट्यांतून एक खलोटा काढला, आणि तो महाराणाजींकडे भिरकावला. त्याचें तें उद्धट वर्तन पाहून महाराणाजींचे डोळे तांबडे लाल झाले. ते पुढें बोलले,

" आमच्या लेकीबाळींशीं तुम्ही अमर्यादेची वागणूक केली, याविषयीं तुमचें काय म्हणणें आहे ?"

"तुम्ही कोण जाब विचारणार ? मुदबळांसके राजे तुम्ही. सगळा तमाम हिंदुस्थान पातशाहतीचा ! पातशाहतीचा बंदा वाटेल तिथें दिल चाहेल तसा वागेल !"

महाराणाजी ओठ दातांखालीं दाबून चिकाच्या पडद्याकडे वळले. ते म्हणाले,

"गजगौरी व्रताचा झालेला अपमान, हा राजपुतांच्या स्त्रीजातीचा अपमान आहे. याचें प्रायश्चित्त तुम्ही सांगावें, हें अधिक बरें !"

संतापानें लाल झालेल्या महाराणीजी हळू शब्दांत म्हणाल्या,

"स्त्रियांना राजकारण कळत नाहीं पण या दिल्लीच्या दूतांना जन्मभर याद राहील अशा भाषेंत याना धडा शिकविला जावा !"

महाराणाजींनीं संकेत करतांच राजपूत जवान त्या यवन दूतांवर कोसळले, आणि त्यांनीं त्यांना निःशस्त्र केलें. महाराणाजी म्हणाले,

"न्हावी बोलवून यांचे पांच पाट उतरवा"

महाराणाजींची आज्ञा त्वरित पाळली गेली. डोक्याचे पाट उतरलेल्या त्या सैनिकांकडे वळून महाराणाजी म्हणाले,

"वजीर–ए–आजमना जाऊन सांगा, या खलित्याचें उत्तर वस्तऱ्यांच्या लेखणीनें आमच्या डोक्यांच्या कागदांवर लिहून धाडलें आहे ! जा ! तोंडें काळीं करा !"

  

ठिणगी पडली, भडका उडाला !

मस्त वराहास भाल्यानें डिवचल्यावर जें होतें, तेंच घडलें. दिल्लीपतीच्या आज्ञेवरून अयोध्येच्या नबाबाचें सैन्य अर्गळच्या राजाशीं झुंजून त्याला नामोहरम करण्यासाठीं भर पावसाळ्यांत अर्गळवर चालून आलें.

महाराणा गौतमसिंगहि वाघणीचें दूध पिऊन बसले होते. अर्गळच्या किल्ल्याचें महाद्वार करकरत उघडलें आणि राजपुतांची शस्त्रास्त्रांनीं सुसज्ज सेना एकलिंगजीचा जयघोष गर्जत बाहेर पडली. किल्ल्यासमोर क्षितिजापर्यंत पसरलेल्या अफाट मैदानांत पुढें सरणारें मोगल सैन्य लष्करन राजपुतांच्या

दृष्टीच्या टप्प्यांत आलें. राजपुतांनीं आपला वेग वाढविला, आणि वाटेंत असलेल्या एका खेडेगांवाच्या शेजारीं एक घनदाट राई होती, तिचा आसरा घेऊन ते दबून बसले.

इतक्यांत आकाश जणूं काय फुटलें असावें, असा अपरंपार पाऊस सुरू झाला. त्यामुळें झालेल्या राडींतून पाऊल पुढें टाकणेंहि मोगल सेनेला महा-दुर्घट होऊन बसलें. सगळा दारूगोळा भिजून चिंब झाला. बंदुका भरीत असतां गज पार दस्त्यापर्यंत पोंचून थटाथट बोलूं लागले. एकीकडे कपाळा-वर जमलेलें पाणी निरपून टाकीत आहेत, दुसरीकडे अंगावरील शस्त्रा-स्त्रांच्या ओझ्यासहित मोठ्या कष्टानें एकेक पाऊल पुढें रेटीत आहेत, अशा विपन्नावस्थेंत हें खेडें पाहून हर्ष पावलेली मोगलसेना कशीबशी खेड्याजवळ येऊन पोंचली.

तों पावसाचा पडदा फाडून तिच्यावर सपासप तिखट धारेचे बाण येऊन कोसळूं लागले ! अगोदरच पावसाच्या धुवांधारीनें उबग आलेला, आणि त्यांत हे बाणांचे आघात ! एकहि बंदूक आवाज देईना. शस्त्रें केवळ भार वहाण्याच्याच काय तीं कामाचीं. शत्रु समोर असता तर त्याच्याशीं कमींतकमी हातापायी तरी केली असती. पण तोहि बेटा महापूर पावसाच्या आड कुठें दडला आहे कोण जाणे !

अशा स्थितींत त्या सेनेनें पण्डितांचा मार्ग स्वीकारला, अर्थात् ' अर्धं त्यजति पण्डित: ! ' ' शिर सलामत तो पगडी पचास ' इत्यादि म्हणींना परत उजाळा देत जेवढ्या लवकर आपलें ठाणें जवळ करतां येईल, तेवढ्या लव-कर तिथें पोंचण्याची त्या सैनिकांत जणूं शर्यतच लागली. थोड्याच अवकाशांत रणांगण रिकामें पडलें.

  

तरीपण शत्रुभय सर्वथा नष्ट झालें नव्हतें, म्हणून वृद्ध पुरोहित हर-कंवरजी महाराणी जानकीदेवींना आग्रहपूर्वक सांगत होते,

" कंवराणीजी ! आपण हें साहस करूं नये. कालच पोटभर मार खाऊन पळालेली नबाबाची फौज गंगातटाकीं तळ देऊन बसली आहे. एका

पौर्णिमेस गंगास्नान चुकलें, तर कांहीं मोठीशी हानि व्हायची नाहीं. ही नसती आपत्ति आपण आमंत्रण देऊन घरांत घेऊं नका ! "

" हरकंवरजी ! नानाप्रकारचीं व्रतवैकल्यें करीत ज्यांनीं आपला जन्म संपवीत आणला, अशा आपण म्हातारपणच्या उंबरठ्यावरून मला हा उपदेश करावा ना ? "

" तसें नव्हे कंवराणीजी— " हरकंवरजी कळवळून म्हणाले.

" मग कसें ? या घरांत पहिलें पाऊल घातलें तेव्हां केवळ सहा वर्षांची होत्यें. सासूबाईंनीं आपल्या कडेवर बसवून मला आंत आणलें, तेव्हांपासून हा नियम चालत आला ! दर पौर्णिमेला सासूबाईंनीं गंगास्नानास जातांना माझ्याकरतां मेणा बरोबर घ्यावा. मी त्यांचें बोट धरून गंगेंत बुडी मारावी. या गोष्टीला वीस वर्षें होऊन गेलीं. या वीस वर्षांत माझा हा नियम मी कधींहि चुकूं दिला नाहीं. महाप्रयाणाच्या वेळी सासूबाईंनीं मला जवळ घेतलें आणि म्हणाल्या, " ऐकलेंस पोरी, आपल्या कुळांत हा गंगास्नानाचा नियम वंशपरंपरेनें चालत आला. सासूबाईंनीं मला दिलेला हा वसा आतां मी तुझ्या स्वाधीन करत्यें. हा नियम पाळशील असें माझ्या पायांवर हात ठेवून सांग ! एऱ्हवीं माझा प्राण कांहीं सुखानें जायचा नाहीं ! "

" मी रडत रडत त्यांच्या पायांवर हात ठेवून मनोमन शपथ घेतली ! त्यानंतर आजारपणें झालीं, बाळंतपणेंहि झालीं. पण मी हा नियम मोडला नाहीं. तो आजच मोडूं म्हणतां ? आणि तोहि श्रावण पौर्णिमेच्या दिवशीं ?" महाराणींनीं विव्हल स्वरांत प्रश्न केला.

" कंवराणीजी ! आपल्या या सत्वामुळेंच अर्गळची राज्यलक्ष्मी अर्गळ सोडून जाऊं शकत नाहीं हें मी जाणतों. पण गंगाकांठ सगळा अविंधांच्या स्वाधीन असतां त्या आगींत आपण होऊन उडी घालणें, हें साहसच नाहीं का ?"

" हरकंवरजी, मी राजपुताची पत्नी, राजपुताची मुलगी ! वेळ पडली तर जगावें कसें आणि मरावें कसें, याचें बाळकडूच प्यालेली ! या आगीला मी भिईन, अशी कल्पना तरी कशी करवली आपल्याच्यानें ? "

"पण मग हें जीवावर उदार होणेंच आहे, असें म्हटलें पाहिजे."

"कसलें आलें आहे उदार होणें ! आपण मुळींच भिऊं नका. आज रात्रीं चौघी दासी व माझ्या माहेरचे जवान पहाडसिंग आणि करमसिंग, अशीं आम्ही चारसहा जणें जाऊं. पहांटे स्नान उरकून सूर्योदय न होतो, तों परतहि येऊं. गंगामाई इथून सगळी आठ मैल; वाटहि पायांखालची."

"पण आपण महारावळजींना विचारलेंत का ?"

"या कुलाचाराच्या बाबतींत त्यांना काय विचारायचें ? आणि विचारलेंहि, तरी ते काय नको म्हणणार आहेत ?"

हरकंवरजींनीं हातांतील जपमाळ गोमुखींत ठेवून दिली, आणि पाटावरून उठत ते म्हणाले,

"पहा बुवा ! आपण पुनः एकदां विचार करावा, असें मला वाटतें."

"आपण एवढीशीहि चिंता करूं नका हरकंवरजी ! अन तशीच वेळ आली, तर उद्यां राखी पौर्णिमाच आहे. कुणाहि भावाच्या हातांत राखी बांधीन, अन् त्याच्यावर भार टाकून स्वस्थ राहीन. आपला आशीर्वाद बरोबर असूं द्या म्हणजे झालें."

हरकंवरजींचे म्हातारे डोळे पाणावले. ते गद्‌गद स्वरांत म्हणाले,

"कंवराणीजी, आपण खुशाल जा ! सकुशल परत याल. मी माझ्या ठाकुरजीला आपल्यासाठीं सांकडें घालीन. हातीं धनुष्यबाण घेऊन तो आपलें संरक्षण करील !"

महाराणींनीं हरकंवरजींना पादस्पर्शपूर्वक नमस्कार केला. त्यांना आशीर्वाद देतांना हरकंवरजींच्या डोळ्यांतून दोन मोती त्यांच्या मस्तकावर पडले !

  

मध्यरात्र उलटून गेली. पाऊस उघडला असला, तरी पृथ्वीच्या शरिरावरील त्याच्या अत्याचारांच्या खुणा अजून मिटल्या नव्हत्या. त्या चिकचिकींतून महाराणीजी, त्यांच्या चार दासी, पहाडसिंग, करमसिंग आणि दुसरे दोन जवान, अशीं नऊ माणसें सपसप पावलें उचलीत गंगातटाक जवळ करीत होतीं.

"ऐकलेंस अंजने ! देव आपला साहाय्यकारी आहे बघ. आकाश निरभ्र होत चाललें आहे. चंद्र क्षितिजाआड लपण्याच्या आंत आपण गंगाजी गाठूं !"

"कंवराणीजी ! तेवढ्या लवकर पोंचायला अजून जरा झपझप पावलें उचललीं पाहिजेत !" पहाडसिंगानें नम्रपणें सुचविलें.

"जळलें रे तुझें झपझप पावलें उचलणें ! असला हा रामरठ्ठ्या चिखल अन् हा म्हणे झपझप पावलें उचला !" अंजनी पहाडसिंगावर डाफरली. तीं दोघेंहि महाराणीजीच्या माहेरचीं माणसें. पहाडसिंग अबोल आणि अंजनी भडभडी. त्यांचा हा असा संवाद नेहमींच चालायचा.

महाराणीजी हंसत हंसत म्हणाल्या,

"त्या बिचाऱ्यावर कां डाफरत्येस तूं ? पाऊस पडला, हा काय त्याचा अपराध ?"

"कंवराणीजी ! पहाडसिंगावर भारी तुमची माया ! असेना का ! मी म्हणत्यें, पाऊस पडला हा त्याचा अपराध नसेल, पण त्यानें आमची जो आज ओढाताण केली आहे त्याबद्दल तरी उद्या त्याला कंवरजींकडून शिक्षा देववत्यें. बाई ग ! या धांवपळीनें माझें अंग न् अंग अगदीं ठणकायला लागलें आहे.

"पण त्यानें गडबड केली. म्हणून आपण इथपर्यंत तरी पोंचलों, जर का तुझ्या चालीनें चालतों, तर मग गंगास्नान घडलेंच होतें म्हणायचें !'

अडखळत पाय घसरत कशींबशीं पहाट होतांवेळीं हीं माणसें गंगेवर पोंचलीं. तिथें घाटावर थांबून महाराणीजींनीं करमसिंगाला पुरोहितास बोलावण्यास धाडलें, आणि बाकीची मंडळी प्रातर्विधि उरकण्यामागें लागली.

वेळ जात चालला. दिशा उजळं लागल्या. करमसिंग परतेना.

अंजनीची अस्वस्थता वाढत चालली. ती तोंडानें गंगेची भूपाळी पुटपुटत होती,

जय जय जगदंब मात शैलजा भवानी
मैया जान्हवी भवानी ॥

पण तिचें मन मात्र प्रतिक्षणीं अधिकाधिक अस्वस्थ होत चाललें होतें.

"आतां उजाडेल ! गावकरी कंवराणीजींना चांगलें ओळखतात! जर कुणीं नबाबाच्या सेनापतीला जाऊन सांगितलें तर !"

महाराणीजी मात्र गंगेच्या घाटावर पाण्यांत पाय सोडून स्वस्थ मनानें बसल्या होत्या. वाल्मिकीचें गंगास्तोत्र त्यांना अत्यंत आवडत असे. त्यांतला

त्वत्तीरे तरुकोटरान्तरगतो गङ्गे विहङ्गो वरम् ।
त्वन्नीरे नरकान्तकारिणि वरं मत्स्योऽथवाकच्छपः ।।
नैवान्यत्र मदांधसिन्धुरघटा संघट्टघण्टारणत् ।
कारत्रस्त समस्तवैरिवनितालब्धस्तुतिर्भूपतिः ।।

हा श्लोक वारंवार म्हणत त्या गंगेच्या प्रवाहाशीं तद्रूप होऊन गेल्या होत्या.

अंजनी त्यांच्याजवळ गेली, आणि म्हणाली,

"कंवराणीजी ! अजून पुरोहिताचा पत्ता नाहीं ! सूर्य वर येत चालला ! "

"मग मी काय त्याला खालीं जायला सांगू ? येतील आतां पुरोहितजी." असें म्हणून परत महाराणीजी आपल्या एकतानतेंत विलीन होऊन गेल्या.

मग मात्र अंजनीचा धीर सुटत चालला. दिवस वाढता होऊं लागला. अखेर करमसिंग एका पुरोहिताबरोबर परतला. पण हा पुरोहित नेहमीचा नव्हता. नित्याचा पुरोहित कुठें बाहेर गांवीं गेला होता, त्यामुळें करमसिंगानें या पुरोहिताला पकडाव करून आणलें होतें.

घाटावर पोंचतांक्षणीच पुरोहितानें महाराणीजींस भला लांबलचक आशीर्वाद दिला, आणि आपल्या कुलाचें श्रेष्ठत्व पटविण्यास पुढील शब्दांत प्रारम्भ केला,

"काय समजल्यात कंवराणीजी ! तर माझे खापरपणजोबा हे काशीला बारा वर्षें मधुकरी मागून अध्ययन करीत होते ! त्यांचे वडील तर चोवीस वर्षें–"

"आणि त्यांचे वडील अठ्ठेचाळीस वर्षें अध्ययनांत बुडून गेले होते पुरोहितमहाराज ! आतां कृपा करून आम्हांला त्वरित संकल्प सांगून मोकळें करायचें पहा ! " अस्वस्थता अनावर झालेली अंजनी पुरोहितावर चरफडली.

"छे छे ! " आपली असंमति प्रकट करीत भूदेव उद्‌गारले, " हें काय भलतेंच म्हणतां ! विश्वेश्वरशर्मा महामहोपाध्यायांचा हा चुलत चुलत पणतू कोणतेंहि धर्मकृत्य यथासांगच पार पाडील ! कंवराणीजी ! सगळा स्नानविधि शास्त्रोक्त झाला पाहिजे ! गडबड करून कसें भागेल ? अगोदर मी स्नान उरकून मगच आपणास संकल्प सांगेन ! "

तो ब्राह्मण वस्त्रें गंगामाईच्या घाटावर ठेवून पाण्यांत शिरला. यथास्थितपणें स्नान उरकून तो घाटावर परतला, आणि नंतर संध्या आणि पितृतर्पण यांचा मांड मांडून बसला ! महाराणीजींसमोर आपल्या कर्मठतेचें प्रदर्शन करण्याची ही दुर्लभ संधि व्यर्थ दवडील, तर मग त्याला विश्वेश्वरशर्मा महामहोपाध्यायांचा चुलत चुलत पणतू कोण म्हणेल ?

सूर्योदय होऊन चक्क ऊन्ह पडलें. महाराणीजी शांत मनानें घाटावर बसल्या होत्या. त्यांच्या एकांतिकतेंत यत्किंचित्‌हि प्रत्यवाय निर्माण झाला नव्हता. पण पहाडसिग, करमसिग, अंजनी, या अनुचरांचीं अंतःकरणें मात्र चिंतेच्या सागरांत अगदीं बुडून गेलीं. हळूहळू लोक जमूं लागले कुजबूज सुरू झाली.

" कंवराणीजी ! कंवराणीजी ! "

महाराणीजींना ते नमस्कार करूं लागले, पण नेमकें हेंच व्हायला नको होतें !

शेवटीं एकदाचें ब्राह्मणाचें नित्यकर्म आटोपलें. त्यानें महाराणीजींसहित त्या सर्वांना गंगेंत उतरण्याची आज्ञा सोडली. मंडळींनीं त्या आज्ञेचें पालन केलें, आणि पुरोहिताचा संकल्प सुरू झाला !

तेवढा मोठा संकल्प तहत वेदकालापासून आजपर्यंत कोणींच कुणाला सांगितला नसेल ! अर्ध घटिका उलटून गेली. सगळी मंडळी गारठून गेली. शेवटीं वारंवार बुडया मारायला लावून आतां कंवराणीजींच्या स्वर्गमार्गातील अडथळा दूर झाला असल्याचें त्या स्वर्गमार्गावरील पहारेकऱ्यानें घोषित केलें !

करमसिग मनांत म्हणाला,

"कंवरराणीजींच्या स्वर्गमार्गाची माहिती मला नाहीं. पण माझ्या स्वर्गमार्गावरील अडथळा मात्र निश्चितच दूर झाला! यवनांपर्यंत वार्ता जाऊन पोंचली असेलच! आज गंगातटाकींच वीरगतीचा योग दिसतो आहे, हें त्यांतल्या त्यांत भाग्य!"

आणि खरोखरीच अर्गळची राणी गंगास्नानास आल्याचें वृत्त यवन-सेनापतीच्या कानांपर्यंत जाऊन पोंचलें होतें!

झाल्या अपमानाचा सूड उगवायची एवढी चांगली संधि प्राप्त झाली असतां ती दवडणें, याला राजनीतींत मूर्खपण म्हणतात. यवनसेनापति कमींत-कमी एवढा तरी राजनीतिपटु खासच होता. त्यानें तीस सैनिकांची एक तुकडी महाराणीजीस पकडून आणण्यासाठीं गंगाकाठीं धाडली.

स्नानें आटोपलीं. पुरोहिताची यथोचित संभावना करून महाराणीजी परत फिरल्या. तोंच चहूंबाजूंनीं मोंगल सैनिकांनीं त्यांना घेरलें. महाराणीजीं-बरोबरच्या दासींनी आणि अनुचरांनीं त्यांच्याभोंवती कडें करून आपापल्या शस्त्रांच्या मुठींवर हात ठेवले.

त्या तुकडीचा नायक पुढें झाला, आणि उर्मट स्वरांत म्हणाला,

"चला, सगळे चला! तुम्हांला कैद करून आणावें, असा आमच्या सालारजंगांचा हुकूम झाला आहे."

पहाडसिंग म्हणाला,

"भल्या माणसा, तूं अर्गळच्या महाराणीजींसमोर उभा आहेस, हें लक्षांत असूं दे! तूं हा हुकूम कुणाला करीत आहेस?"

"वा:!" नायक हर्षनिर्भर होऊन म्हणाला, "तेंच काम तर आलें आहे आमच्याकडे! तेव्हां आतां मुकाट्यानें आम्हांबरोबर चला!"

तो आपल्या सैनिकांकडे वळला आणि बोलला,

"मुबारक, यांचीं शस्त्रें काढून घ्या!"

महाराणीजींनीं हे शब्द ऐकले मात्र, आणि त्या घनगंभीर स्वरांत बोलल्या,

"पहाडसिंग, आपल्या मार्गानें पुढें व्हा! रजपुतांची वाट कुणी अडवूं शकत नाहीं, हें या लोकांना कळूं द्या!"

महाराणीजींनीं आपलें कृपाण उपसलेलें पहातांच दासींच्या कट्यारी आणि रजपुतांच्या तरवारी सर्‌कन् म्यानाबाहेर पडल्या. पहाडसिंग पुढें झाला. मध्यें महाराणीजींना घेऊन तो मनुष्यनिर्मित दुर्ग पुढें सरून यवनसैनिकांतून मार्ग काढूं लागला.

चार पुरुष आणि पांच स्त्रिया. सगळे मिळून नऊ जण. खरोखरीच अद्‌भुत दृश्य ! रजपूत अबला प्रसंग पडतांच सबलांच्या तोंडांत मारूं शकतात, हें सत्य जरी त्या तुकडीच्या नायकाला अद्‌भुत होतें, तरी तें कांहीं त्याला अपेक्षित नव्हतें, आणि सुखकर तर मुळींच नव्हतें. महाराणीजींचा युद्धावेश पाहून तो कांहीं क्षण चकितच झाला. आपल्या तुकडीला कांहीं आज्ञा करण्याचेंहि तो विसरला.

पण जेव्हां ती मंडळी बरीच पुढें सरून वळणावरून दृष्टीआड होतां दिसूं लागली, तेव्हां मात्र चिडून तो नायक ओरडला,

" अरे ! काय केळीं खात उभे राहिलां कीं काय ? एक औरत आपणा तीस जणावर डोळे फाडीत निघून जाते. आणि तुम्ही केवळ दांत काढतां ? व्हा पुढें एकाला तावडींतून निसटूं देऊं नका. तीं माणसें शस्त्रें चालवूं लागलीं, तर तुम्ही तरवारींचा उपयोग करा. पण सांभाळा, त्या राणीला एवढीहि इजा होता उपयोगाची नाहीं ! "

त्या सैनिकांना तेंच पाहिजे होतें. कोलीत घेऊन तीं भुतें त्या मानवदुर्गापुढें जाऊन उभीं ठाकलीं. एक भला थोरला आडवा तिडवा यवन सैनिक मार्ग अडवून उभा राहिला, आणि दांत काढीत हसूं लागला. मार्ग अरुंद होता. दुतर्फा ओघळी होत्या. रजपूत वीरांची गति अवरुद्ध झाली.

पहाडसिंगानें महाराणीजींकडे पाहिलें. त्यांचा इशारा मिळतांक्षणींच त्यानें आपल्या रुंद पात्याच्या खांड्यानें त्या यवन सैनिकाचे दोन भाग केले !

आतां मात्र यवन सैनिक चिडले. त्यांनीं लगट करायला प्रारंभ केला. घेमारदेमार सुरू झाली. पहाडसिंगावर एका सैनिकानें दांत खात वार केला.

'थोड्याच वेळांत करमसिंग सार्थकीं लागला. यवन सैनिकांच्या आडव्या तिडव्या वारांनीं पहाडसिंगहि तोच मार्ग धरणारसें दिसूं लागलें ! आणि ती

हातघाई प्रत्यक्ष महाराणीजींपर्यंत पोंचली. त्यांनीं करमसिंगाच्या मुठींतून त्याचा खांडा सोडवून घेतला, आणि पुढें आलेल्या एका सैनिकावर घाव घातला. दासींच्याहि कट्यारी स्वैर चालूं लागल्या.

ही भयंकर वार्ता गांवभर उन्हाळयांतल्या आगीसारखी पसरली. युद्ध-स्थलाकडे गांवकऱ्यांनीं धांव घेण्यास प्रारंभ केला.

पहाडसिंगहि खालीं आला. स्वतः राणींचा हातदेखील तरवारीच्या घावानें कापला गेला. दासींपैकीं दोघी कामीं लागल्या. आकाश फाटल्यागत भासूं लागलें.

तत्क्षणीं रात्रीं हरकंवरजींबरोबर बोललेले शब्द महाराणीजींच्या मनांत चमकून गेले. त्या स्मृतीनें त्यांचे नेत्र विस्फारले. भोंवतालीं जमूं पहणाऱ्या लोकांकडे त्यांनी एक दृष्टिक्षेप केला. आणि साद घातली—

" भाऊ आहे का कोणी माझा ? "

ती करुण हृदयाच्या अन्तस्तलापर्यंत पोंचणारी हांक !

जो संकटग्रस्त द्रौपदीनें पाठीराख्या कृष्णाला मारली होती !

हे नाथ ! हे रमानाथ ! व्रजनाथार्तिनाशन ।

प्रपन्नां पाहि गोविन्द ! कुरुमध्येऽवसीन्दतीम् ।।

महाराणीजी गद्‌गद् होऊन बोलत होत्या.

" अहो गांवकऱ्यांनो ! आपल्या या विपन्न बहिणीकरितां धांवत यावें असें कुणालाच नाहीं का वाटत ?

" आज राखी पौर्णिमा !

" आज बहिणीनें भावाच्या हातीं राखी बांधायची. मी मनोमन राखी बांधतें !

" जो कोणी धांवत येईल त्याच्या हातांत !

" जो कोणी आपल्या या बहिणीचा भार आपल्या मस्तकीं घेईल, त्याच्या हातांत !

" यावें कुणी भाऊराया ! "

तोंच वेगानें पुढें झेंप घेत एका यवन सैनिकावर घाव घालणाऱ्या एका तरुण राजपुत्राचें उत्तर निनादलें.

“ दीदी ! पोंचली राणी ! चालों चला ! ”

आपल्या पांचसहा साथीदारांसह त्या रणधुमाळींत उडी घेणाऱ्या त्या वीराचें नांव होतें अभयचंद.

अधिक बोलायला वेळच नव्हता. तरवारींच्या वारांची देवाण घेवाण सुरू झाली. महाराणीजींभोंवतीं मंडल करून हे वीर वाट मोकळी करूं लागले. सरासर तो मार्ग काढुनं पुढें सरूं लागला. इतक्यांत त्या नवागतांपैकीं एक योद्धा जबरदस्त जखमी होऊन खालीं पडला ! त्याचें नांव निर्भयचंद !

महाराणीजींचें मातृत्व जागें झालें. त्या निर्भयचंदाला सांवरूं गेल्या. तों अभयचंद ओरडला,

“ ऊंहूं दीदी ! पुढें सरकायचें पहा ! पडूं द्या त्याला ! सार्थक झालें त्याचें. आपल्या बहिणीची प्रतिष्ठा राखण्यांत खर्च झाला. द्या त्याच्यावर पाय ! त्याशिवाय पुढें सरतां यायचें नाहीं ! चला लवकर ! ”

तोंडासमोरील यवनांची फळी विरळ होत चालली. एका उसळीसरशीं महाराणीजी व उरलेल्या दोन दासी पुढें सरल्या. हाणामारी करीत ती मंडळी यवनांच्या हातून सुटणारसें दिसूं लागलें.

अभयचन्द आपल्या छातीच्या ढालीवर यवन सैनिकांचे घाव झेलीत पुढें वाट करीत होता, तों त्याला समोर माणसांचा गलगा ऐकूं आला ! त्याला वाटलें, समोरूनहि यवनांना मदत आली ! आतां काय होईल तें होवो ! आपल्या शरिरांत प्राण असेपर्यंत मात्र आपण आपल्या बहिणीची अप्रतिष्ठा होऊं द्यायची नाहीं !

तो गर्जला,

“ जय एकलिंगजी ! ”

तों समोरून उत्तर आलें,

“ जय एकलिंगजी ! ”

महाराणा गौतमसिंग महाराणीजींचा तपास घेत पांचशें सैनिकांनिशीं धांवत येत होते !

तें रजपूत सैन्य पाहून उरलेले यवन सैनिक आपले प्राण वांचविण्या-साठीं रणभूमीवरून अदृश्य झाले. महाराणा गौतमसिंग महाराणीजींजवळ येऊन प्रेमभरानें म्हणाले,

" एकटी आलीस ना ? मलाहि नाहीं कळविलें ! "

एवढा वेळ कालीस्वरूपिणी झालेल्या महाराणीजी आतां करुणामयी जगदंबेचें रूप ल्याल्या. महाराणाजींना कांहीं उत्तर न देतां त्या निर्भय-चन्द्राच्या प्रेताजवळ बसल्या, आणि आपले ओलावलेले नेत्र पुशीत म्हणाल्या,

" बिचारा माझ्यासाठीं खर्च झाला ! "

जखमी झालेला अभयचन्द म्हणाला,

" तुम्हांकरितां नव्हे दीदी ! अर्गळच्या महाराणीजींकरितांहि न व्हे ! राखीबंद भाईच्या कर्तव्याकरितां ! "

---

# धर्माचा भाऊ—

दिवसभरच्या उन्हाची लायखाय निवली होती. रांगोळीसारखें पांढरें फेक चांदणें नारळी पोफळींच्या झांवळ्यांवरून खालीं ओघळत होतें. तटापलीकडे पश्चिमसमुद्रावरून येणारा उधाणवारा मोठा शीतळ भासत होता. कुठेंतरी फुललेल्या निशिगंधाचा मंदसा सुवास मधून चित्त संतुष्ट करून जायचा, नदीच्या निर्मळ महाप्रवाहांत सोडलेल्या दुधाच्या इवल्याशा धारेसारखा.

त्या झांवळ्यांच्या छायाप्रकाशांत हातांत हात घालून एक जोडपें हिंडत होतें. लुईस व्हेलेंझो, तारापुरचा पोर्तुगीझ किल्लेदार, अन् त्याची प्रिय पत्नी जेनी. पोर्तुगालमध्यें लिस्बनजवळील एका खेडेगांवांत असलेल्या तिच्या वडिलांच्या घरीं लांब कंटाळवाणे सहा महिने घालवून नुकतीच आठदहा दिवसांपूर्वीं ती एका व्यापारी जहाजांतून हिंदुस्थानांत परतली होती.

हे सहा महिने लुईसनें कसे काढले, हें त्याचें त्याला ठाऊक. पोर्तुगाल देश हिंदुस्थानपासून इतका लांब असल्याबद्दल अगोदर तो खूप संतापला. पण आपलें संतापणें हें पोर्तुगाल आणि हिंदुस्थानांतील अंतर कमी करण्याचें साधन निश्चितच नव्हे हें कळून आल्यावर द्रव्यलाभाच्या आशेनें पोर्तुगाल सोडून एवढें लांब निघून आल्याबद्दल त्यानें स्वतःला खूप शिव्या देऊन घेतल्या.

एऱ्हवीं लुईस व्हेलेंझो, हा मोठा नेकीचा किल्लेदार. गोवा किंवा वसई येथून येणाऱ्या वरिष्ठ अधिकाऱ्यांच्या आज्ञा तो मोठ्या तत्परतेनें पाळी.

तारापुरचा मूळचा कामचलाऊ कोट त्यानें मजबूत बांधून घेऊन त्याची अगदीं चोख व्यवस्था ठेवली होती. तारापुर शेजारीं असलेल्या एका खडकावर त्यानें एक लहानसें दीपगृह बांधवून घेऊन येत्याजात्या जहाजांची सोय मोठी आपह-कीनें केली होती. एऱ्हवीं स्थिर असलेला त्या दीपस्तंभावरील दिवा वाद-ळाच्या वेळीं एका विशिष्ट गतीनें हलून गलबतांस बंदर जवळ असल्याचा इशारा देई. मग बंदरांत आल्यावर किल्लेदार हबसाणी अथवा मराठ्यांच्या गलबतांकडून चांगला भरपूर पैका वसूल केल्याशिवाय त्यांना शिडें उभारूं देत नसे, ही गोष्ट अगदीं वेगळी. पण त्यांचा बचाव तर त्या युक्तीमुळें अगदीं खासच होत असे.

लुईसचें लग्न होऊन तरी असे किती दिवस झाले होते? सगळीं चार वर्षें, लहानपणीं आपल्या वडिलांच्या शेतांत हातीं पांढरेंफेक चिमणें कोंकरूं घेऊन उभी असलेली गोरोपान, गुलाबी गालांची, फ्रॉक घातलेली लहानगी जेनी जेव्हां लुईसनें पाहिली, तेव्हां त्याचेंही वय कांहीं फारसें नव्हतें. तिला पाहून त्याला काय वाटलें, कोण जाणे, पण आपल्या दाईची नजर चुकवून धांवत तो जेनीजवळ गेला, आणि अंगांतल्या कोटामागें अडकविलेला झुबा मागें फेंकीत तिचा हात धरून तो तिला म्हणाला,

"तूं मला आवडत्येस! आमच्या घरीं येशील?"

त्यानंतर जेनीनें काय उत्तर दिलें, त्यावर लुईस काय म्हणाला, हें सगळें सांगत बसायचें कांहीं कारण नाही. पण मग अकरा वर्षांनीं विवाह-समारंभाचे वेळीं धर्मोपदेशकाचें धर्मप्रवचन ऐकत असतां जेव्हां लुईस व जेनी यांनीं एकमेकांच्या मुद्रांकडे चोरून पाहिलें, तेव्हां अनेक दिवसांची कामना पूर्ण झाल्याचें समाधान दोघांच्याही मुद्रांवर झळकलें. जेनीच्या झग्याचा घेर धरून उभी असलेली तिची मैत्रीण हें त्यांचें चौरकृत्य पाहून खट्याळपणें खांकरली, तेव्हां पुनः त्या दोघांनीं गंभीर मुद्रा करून धर्म-प्रवचनाकडे लक्ष पुरविल्याचा आव आणला.

त्यानंतरचें त्यांचें वैवाहिक जीवन अत्यंत मधुर होतें. मधुचंद्राचे दिवस त्यांनीं सागरतटाकीं एका खेड्यांत घालविले. दिवसभर समुद्राच्या वाळूवर

हुंदडावें, माशे धरावेत, कधीं होडग्यांत बसून समुद्राच्या निळळ असलेल्या पाण्यावर चांदण्याची मजा चाखावी, तर कधीं क्षुब्ध समुद्राशीं झुंजत निधड्या छातीनें नांव हांकारावी, असा त्यांचा दिनक्रम.

त्यानंतर लुईस हिंदुस्थानशीं व्यापार करणाऱ्या कंपनीशीं करार करून हिंदुस्थानांत आला, त्या वेळीं त्याच्याबरोबर जेनी होतीच. तिला हा देश अत्यंत आवडला. लुईस हा अंधश्रद्ध ख्रिस्ती होता. पण जेनी मात्र या बाबतींत थोडीशी हळवी होती. केवळ ख्रिस्तावर विश्वास ठेवणारीं माणसेंच स्वर्गाची पायरी चढून वर जातात, आणि इतरांना अनंतकालपर्यन्त नरकाच्या यातना सहन कराव्या लागतात, हा युक्तिवाद स्वीकारण्याचें साहस तिच्यानें करवत नसे. त्यामूळें पोर्तुगीझ पाद्री हिंदुस्थानवासीयांचें धर्मपरिवर्तन करून त्यांना स्वर्गाचा मार्ग अनवरुद्ध करून देण्याच्या उदात्त हेतूनें प्रेरित होऊन इहलोकीं त्यांचे जे क्रूर हाल करीत, ते तिला अगदीं बघवत नसत. पाद्री म्हणत, जर त्या लोकांचें परलोकीं कल्याण करायचें असेल, तर ते त्या कल्याणाच्या मार्गावर चालू लागेपर्यंत इहलोकीं त्यांना अशाच यातना सोसायला लावल्या पाहिजेत. जेनी विचार करी कीं, जो परलोक नेमका कुठेंसा आहे, हें या पाद्रयांनाहि नीटसें सांगतां येणार नाहीं, त्या परलोकांतले मद्यचषक, आणि प=या, यांचा लोभ धरून या परधर्मियांनीं धर्माकरितां पाद्री लोकांकडून होत असलेला हा छळ कां सोसावा ?

पण लुईसवर तिचें जें निरतिशय प्रेम होतें, त्याच्या तेजापुढें तिच्या या परधर्मसहिष्णुतारूपी तारका निस्तेज होऊन जात. ती ते सगळे एतद्देशीयांचे होत असलेले छळ डोळ्यांवर कातडें ओढून घेऊन सहन करी

ती पोर्तुगालहून परतली, तेव्हां मात्र कोमेजलेला लुईस पुनः पूर्वीइतकाच ताजातवाना झाला. त्याचें कोटांतील शिबंदीवर डाफरणें कमी झालें, त्याच्या हाताखालील अधिकाऱ्यांना त्याच्या स्वभावांतील बदल एकदम जाणवला, आणि त्यांनीं त्या रात्रीं झोपतांना देवाजवळ मागायची भाकरी अगदीं मनोभावें मागितली.

आज चांदणें मोठें फक्कड होतें. रात्रीं जेवणें उरकल्यावर एकमेकांच्या आरोग्याची कामना करीत त्या दोघांनीं मद्याचे दोन लहान प्याले रिते केले,

आणि मीं फिरायला म्हणून बंगल्याभोंवतालच्या नारळीच्या बागेंत शिरलीं.

एका फणसाच्या झाडाखालीं एक बांक टाकलेला होता, त्याजवळ गेल्यावर जेनी लुईसला म्हणाली,

" लुईस ! आपण या बांकावर बसलों तर ?"

" तुझ्या इच्छेप्रमाणें. कां दमलीस कीं काय ? "

" छे रे ! दमल्यें नाहीं. या वेळीं समुद्राच्या वाळूवर हिंडण्यांत जो अपरिमित आनंद आहे, तो तुझ्या कडक शिस्तीमुळें मिळेनासा झाला आहे. किल्ल्याचे दरवाजे उगीच एवढ्यातेवढ्या कारणासाठीं उघडायचे नाहींत, असा तुझा नियम. आणि मला चांदण्या रात्रीं या नारळींच्या लांबलांब पसरलेल्या छाया मुळींच आवडत नाहींत. मला प्रकाश आवडतो. मग अशा सांवल्या विनाकारण ओलांडीत हिंडण्यांत काय मौज आहे ?"

तीं दोघें एकमेकांस चिटकून बांकावर बसलीं. जेनीचा हात आपल्या हातीं घेऊन तिच्या लांब, भेंडीसारख्या नाजूक बोटांशीं खेळत लुईस म्हणाला,

"सांग बघूं ! हे सहा महिने तूं कसे घालविलेस ? "

"मला वाटलें, हे सहा महिने कधींच संपणार नाहींत. रोज सकाळीं सूर्योदय झाल्यानंतर कितीतरी वेळानें संध्याकाळ होई, मग रात्र, मग पहाट, मग कुठें पुनः दुसऱ्या दिवशीं सूर्याचें तोंड दिसे ! लुईस ! तूं मोठा वाईट आहेस !"

"कां ग ? "

"तूं मला हे सहा महिने तिकडे कां ठेवलेंस ? आतां वाटेल तें झालें, तरी मी तुझ्याजवळून कुठें जायची नाहीं."

"मी तरी कुठें पाठवीत होतों तुला ? त्याच वेळीं म्हातारा फ्रांसिस स्वतः बोटीचा कप्तान होता, म्हणूनच तुझ्या वडिलांचीं फार पत्रें आल्यावरून तुला धाडलें. "

"तूं धाडलें नसतेंस, तर कांहीं मी रागावल्यें नसत्यें तुझ्यावर ! लुईस ! तूं मला किती आवडतोस म्हणून सांगूं ? "

जेनीनें आपले दोन्ही हात त्याच्या गळयांत घातले आणि आपलें मस्तक त्याच्या छातींत लपविलें. तिच्या अत्यंत मऊ, सोनेरी रंगाच्या केसांत आपलीं बोटें हळुवारपणें फिरवीत लुईस म्हणाला,

"जेनी! माझी लाडकी जेनी! मीही तुझा विरह सहन करूं शकणार नाहीं, मुळींच नाहीं!"

नेमक्या याच वेळीं वाऱ्याचा एक जबरदस्त फटका बसून नारळी पोफळी अगदी बुंध्यापासून हलल्या, आणि त्यांचें डोलणें सुरू झालें. फणसाचीं दहा-वीस पानें टपटप करीत गळून खालीं पडलीं. लुईस आश्चर्य करीत म्हणाला,

"आज सायंकाळपर्यंत तर वादळाचें चिन्हही नव्हतें. आणि आतांच कसा अचानक वारा तुफानला आहे कोण जाणे?"

"असूं दे वारा. मला वादळांत बसणें बरें वाटतें."

"पण तुला कालच थोडासा ताप आला होता ना? तापावर ही वादळी हवा बरी नव्हे. चल, घरांत चल."

तीं दोघें उठून बंगल्याच्या आवारांत शिरलीं, तोंवर तुफानाचा जोर वाढला. मघां स्वच्छ असलेल्या आकाशांत ढगांची पेंढारगर्दी सुरू झाली. थोड्याच वेळांत सगळें आकाश झांकोळून गेलें. नारळी पोफळींच्या दाटीतून वाट काढीत आणि त्यांना अगदीं सहज हेलकावे देत वारा स्वच्छंदानें रोरावूं लागला.

दारांत उभा राहून पहारा करीत असलेल्या पहारेकऱ्याच्या प्रणामाकडे दुर्लक्ष करीत लुईसनें जेनीला तिच्या शय्यागृहांत नेलें व तिथें असलेल्या खुर्चीवर बसत तो तिला म्हणाला,

"आतां तूं विश्रांति घे. मी तुफानाचा बेतबात पाहून नतर मग झोंपेन."

लुईस शयनगृहाच्या खिडक्यांची दारें बंद करायला उठला, तोंच त्याचें लक्ष दीपगृहावरील दिव्याकडे गेलें. तो दिवा आपल्या विशिष्ट गतीनें हलूं लागला होता.

"एकादें गलबत जवळपास आलेलें असावेंसें वाटतें." लुईस म्हणाला.

"तुफानाचा जोर वाढतोय्. नस्तांतून गलबत नीटपणें आंत शिरूं शकेल ना ?"

"होय. कोणाचें जहाज आहे, तें मला पाहिलें पाहिजे. तूं झोंप."

लुईस बाहेर पडला. जेनीनें झोंपतांवेळीं घालायचीं वस्त्रें लेऊन मनोभावें प्रार्थना केली, आणि ती शांतपणें झोंपीं गेली.

थोड्याच वेळांत दरवाजाच्या आवाजानें तिची झोंप उचकटली. चिंतातुर लुईस आंत शिरत होता ! त्याची मुद्रा पाहून जेनी उठून बसली, आणि आतुरतेनें म्हणाली,

"कां ? काय झालें ?"

"मराठे तारापुरावर चालून येताहेत !"

"काय ?" भिऊन जाऊन जेनी म्हणाली.

"होय. गलबत आले, तें वसईहून. तिथून गव्हर्नराचें पत्र आलें आहे. चिमॉजी ऑपा बरोबर मोठें सैन्य घेऊन एकेक ठाणें सर करीत इकडे येत आहे. माहीम पाडाव झालें, त्याचा रोख आम्हाकडे आहे !"

"हा चिमॉजी कोण ?"

"मराठ्याच्या राजाचा मंत्री आहे, त्याचा भाऊ."

जेनी उठून लुईसच्या जवळ गेली. त्याच्यासमोर उभी राहून त्याचे बाहु धरून ती म्हणाली,

"लुईस ! तर मग आतां युद्ध होईल !"

"होय !"

"युद्ध सुरू झालें, तरी तूं मला दूर पाठवणार नाहींस ना ?"

"नाहीं !"

"माझ्या गळ्यांतल्या क्रूसावर हात ठेवून सांग !"

लुईसनें जेनीचें मुख उचलून तिच्याकडे पहात म्हटलें,

"माझ्या जेनी ! शपथ घेण्याची आवश्यकता नाहीं. काय वाटेल तें झालें, तरी मी तुला माझ्यापासून दूर करणार नाहीं !"

जेनीनें पुनः एकदां त्याच्या छातींत आपलें तोंड लपविलें.

  

ताराघुरच्या कोटाला वेढा पडून आठ दिवस होऊन गेले. पण कोटांत प्रवेश होईना. सगळा मराठमोळा दांतातळीं ओठ रगडीत होता. एवढाले डोंगरी किल्ले, आकाशाशीं गोष्टी बोलणारे, वज्रालाही दाद न देणारे त्यांचे तट, पहातां पहातां पायोटीं खालीं पडावीं, एवढ्या उंचीचे. ते किल्ले हंसतां खेळतां, तंबाखू खातां खातां फस्त केले! अन् हा नासुकला कोट आज आठ दिवस ताठरपणें झुंजतोय्! होळकर, शिंदे, असली नामवंत सरदार मंडळी मार खाऊन झुंज देत्येय पण तटांत माणूस शिरणें तर दूरच, पण फुसकुलें पांखरूंही मराठ्यांकडले शिरेना!

किल्ल्याची अवस्थाही अशी मोकेशीर! एका बाजूनें समुद्र, दुसरीकडे खाडी. केवळ दोन बाजू मोकळ्या. फिरंग्यांचा ओर पाण्यांत, त्यामुळें समुद्राकडून काम चालतां दिसत नाहीं. खाडींत पाऊल घालावें, तों कडाबिनी अन् जेजालांचा असा कांहीं जबरा मारा कीं, अगदीं तोंड घेववत नाहीं. दोन्ही बाजूंकडून मराठे मढी ऐन तटाला भिडून आंत घिरायची शर्थ करीत होते, पण कांहीं उमग पडतां दिसेना!

खासे चिमाजी आप्पा घोड्यावर मांड ठेवून दिवसभर लढत्या मराठेवीरांना भले भले म्हणून नांवाजीत हिंडताहेत. जेवण नाहीं खाणं नाहीं. मुदपाकखान्यानें स्वयंपाक करून वाट पहात ताटकळत बसावें, पण अप्पांना घांस गोड लागत नाहीं; अप्पांची प्रकृति तुनुमुनु, पण शिस्त भारी कडक! त्यामुळें जेवायची आठवण करायास गेलेले शागीर्द घटका घटका उभे रहात, अन् कांहीं बोलायचें साहस न झाल्यानें चिमणीएवढें तोंड घेऊन परतून मुदपाकवाल्यांचीं बोलणीं खात!

शेवटीं नवव्या दिवशीं सकाळीं मल्हारराव होळकर मुजरा करायास आले, तेव्हां अप्पा कातावून बोलले,

"मल्हारबा, आज खाडीत शिरून मुकाम लावायचे! पाणी ओहोटायला सुरुवात झाली कीं, माणसें घाला! काय वाटेल तें होऊं दे. एक पडला, तर त्या ठायीं दुसरा! पडला तो स्वामीसेवेंत रुजू झाला. मागचें पाहून घणार स्वामी समर्थ. त्याची चिंता नको. काय वाटेल तें करून कोट सर झालाच पाहिजे!"

खाडी पार करून इरेसरीनें मावलेले मावळे तटाखालून मार देणाऱ्या फिरंग्यांच्या गोळ्यांस न जुमानतां तटाच्या अंगाला लपले. पहारी सुरू झाल्या. हां हां म्हणतां सुरुंग तयार झाले. संध्याकाळीं गरम असुड अंगावरून ओघळत असलेले मावळे परतले, ते काम फत्ते करून.

रात्रीं अंधार पडल्यावर शेंपन्नास टेंभा मराठ्यांच्या तळावरून किल्ल्याच्या पलीकडील अंगास निघाला. हें पाहून फिरंग्यास वाटलें कीं, मराठे जमिनीकडील अंगानें येणार.

लुईसनें सगळी शिबंदी तिकडे हलविली. जमिनीकडील तटावर दारूनें भरलेलीं मडकीं, राळ, कडाबिनी, असा दरोबस्त बंदोबस्त करून ठेवला, आणि तो जेवणाकरितां बंगल्याकडे वळणार, तोंच त्यानें खाडीकडील सुरुंगाचा धमाका ऐकला ! त्याच्या पोटांत गोळा उभा ठाकला ! त्याला वाटलें, नासलें शिजविलें अन्न !

तो तसाच घाईघाईनें हातीं पिस्तुल घेऊन खाडीच्या अंगाकडे धांवला तों त्यानें सुरुंगाचे आणखी दोन बार ऐकले, आणि त्यानंतर त्याच्या हृदयाचें पाणी पाणी करीत तटाच्या धोंडी कोसळल्याचा आवाजही त्याच्या कानीं पडला !

जेनी त्याची वाट पहात होती. बराच उशीर होऊन गेला, तरी लुईसची साद तिच्या कानीं पडली नाहीं; म्हणून मग ती गच्चीवर उभी राहून त्याची मार्गप्रतीक्षा करूं लागली. थोड्याच वेळांत तिनेंही सुरुंगाचे बार ऐकले, व नंतर कांहीं वेळानें खाडीपलीकडील रान पेटल्यागत उजेड दिसूं लागला !

मराठे कोसळलेल्या तटांतून हातीं पलिते घेऊन शिरत होते ! टेंभे जमिनीकडील अंगास धाडले, ती केवळ फसवणूक !

लुईसनें पळतांपळतां वाटेंत भेटल्या सैनिकास हुकूम सोडला,

"आल्फांसो ! तडाक जमिनीकडील तटाकडे जा, आणि कॅप्टन जुझाला म्हणावें, सगळे सोल्जर्स इकडे आण, खाडीकडे !"

लुईस स्वतः त्या पडल्या खिंडाराच्या तोंडाशीं उभा ठाकला. त्याच्या एका हातीं तरवार होती, दुसऱ्या हातीं पिस्तुल. त्यानें भराभर गोळ्या

झाडायास प्रारंभ केला. जे मराठे ईरेसरीनें पुढें सरत होते, ते ठाइंच्या ठाइंच कोसळले. पण त्या मराठ्यांच्या बिनीच्या तुकडीमागें होते खासे! आज काय वाटेल तें झालें तरी कोट घ्यायचा, असें कंकण हातीं बांधून खासे स्वतः कमरेस दो दो तरवारी लटकावून झुंजांत शिरले होते!

मराठ्यांनीं पिस्तुलांच्या गोळ्यांस न जुमानतां पुढें जोर केला. लुईसचे सोल्जरही त्याच्या मदतीस आले. दोन्ही बाजवा अगदीं रक्त गळेस्तोंवर ओंठ दांतांखालीं रगडून झुंजत होत्या.

पण लुईसच्या सैन्याला इकडे यायला उशीर झाला! दान मराठ्यांकडून पडले. त्याच्या सैन्याचा भला मोठा तुंबारा तटाच्या आंत येऊन तटाला नेटला, व गोल धरून पुढें सरूं लागला. डोळ्यांत रक्त उतरलेला लुईस पिस्तुल झाडीतच होता. पिस्तुल तापून त्याचा हात भाजूं लागला, पण रणीं उभ्या शिपायाला त्याचें काय सुखदुःख!

अचानक मराठ्यांकडून एक गोळी सूं सूं बोलत आली, आणि लुईसच्या छातीचा ठाव घेऊन तिच्यांत रुपून बसली! "जेनी!" असें ओरडत लुईस खालीं पडला, त्याच्या अंगावरून मराठ्यांची दौड किल्ल्यांत घुसली!

  

सकाळीं किल्ल्यावर मराठ्यांचा जरीपटका डुलत होता. त्याच्या शेजारीं चिमाजी अप्पा उभे राहून मल्हाररावांशीं झुंजाच्या गोष्टी करीत होते, तों त्यांनीं पाहिलें कीं, एका म्लानवदना फिरंगी स्त्रीस घेऊन कांहीं मराठे त्यांच्याकडे येत आहेत! त्या स्त्रीमागे तिची दासी भीत भीत चालली आहे!

ती जेनी होती! रडून रडून आंगवें केव्हांच संपलीं, आतां मुखावर केवळ म्लानता अविरत राज्य करीत आहे! डोळे कुणीकडे आणि काय पहाताहेत, हें तिचें तिला ठावें नाहीं!

ती मृतांच्या गर्दीत आपल्या प्रिय पतीचें प्रेत शोधीत होती, तों कांहीं मराठे सैनिकांनीं तिला अडवून अप्पांकडे आणलें.

मुजरा करून एक सैनिक म्हणाला,

"धनी, ही मेले मुडदे धुंडाळीत होती. बहुधा त्यांच्या अंगांवरील जडजवाहीर–"

पण अप्पांच्या मुद्रेवरील भाव वाचून त्याला पुढें बोलायचें साहस झालें नाहीं. अप्पा शेजारीं उभ्या अणजूरकरांस बोलले,

"कोण ही ?"

त्यांनीं जेनीच्या मागच्या दासीजवळ चौकशी केली, व अप्पांस वृत्त सांगितलें. अप्पा बोलले,

"तिला काय पाहिजे तें पुसा !"

अणजूरकरांनीं पोर्तुगीझ भाषेंत जेनीला विचारलें,

"तुम्हांस काय पाहिजे ?"

"माझ्या लाडक्याचें प्रेत !"

"तुम्ही त्याचें काय कराल ?"

"मी माझ्या हातांनीं खड्डा करून त्यांत त्याचें दफन करीन ! मराठ्यांचा सरदार माझा धर्माचा भाऊ ! त्याला म्हणावें, माझा लुईस इथला किल्लेदार होता ! कमींतकमी त्याचें प्रेत तरी इतरांबरोबर खंदकांत लोटूं नकोस ! अन् लोटायचें असेल, तर मलाही त्याच्या शेजारीं झोपू दे, मग वर माती ढकल !"

अणजूरकरांनीं अप्पांना तिचें म्हणणें ऐकविलें. तशी त्यांची मुद्रा गंभीर झाली. त्यांच्या पापण्या ओलावल्या. ते अणजूरकरांस म्हणाले,

"तिला सांगा, तुझें नातें रुजू झालें ! किल्लेदाराचें प्रेत शोधून काढा! पेटी आणून त्यांत तें इतमामानें ठेवा. प्रेतयात्रेबरोबर आमचें सगळें सैन्य असेल, आणि पेटीच्या पुढें डोईवरून पागोटें उतरून आम्ही चालूं !"

अणजूरकरांनीं जेनीला हें सांगतांच तिची मुद्रा एकदम पालटली. ती अप्पांकडे वळून म्हणाली,

" खरेंच हें ? "

अप्पा म्हणाले,

" अणजूरकर, काय म्हणते ती ? "

" ती विचारते, हें खरेंच का ? "

" तिला सांगा, मराठे आपल्या मेहुण्याच्या प्रेतयात्रेला स्वतः उपस्थित रहात असतात ! "

अणजूरकरांनीं हें जेनीला सांगितलें मात्र, तिच्या डोळ्यांतून पुनः आंसवें वाहूं लागलीं ! ती पुटपुटली,

" भाऊ ! माझा भाऊ ! पण फार उशीरां नातें जोडलें ! "

---